# अस्पृश्यांचा लष्करी पेशा

चांगदेव भ. खैरमोडे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# अस्पृश्यांचा लष्करी पेशा

लेखक :
चां. भ. खैरमोडे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.



प्रथम आवृत्ती :
व्दितीय आवृत्ती : फेब्रुवारी १९९२
तृतीय आवृत्ती : २००२

**प्रकाशक :**
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत, तिसरा मजला,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई - ४०० ०१४.



**मुद्रक :**
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार,
५, फोटोझिंको पथ, पुणे-४११ ००१.

किंमत : रू. ४०/-

# अर्पण पत्रिका

माझे दिवंगत पिताजी
कृष्णाजी बाबाजी गायकवाड (धारवाड)
यांना कृतज्ञतापूर्वक अर्पण

— द्वारकाबाई

# निवेदन

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विस्तृत चरित्र लिहिणारे श्री. चांगदेवराव खैरमोडे यांनी डॉ. आंबेडकरांच्या चरित्राच्या नवव्या खंडामध्ये "अस्पृश्यांचा लष्करी पेशा" असा मथळा देऊन महारांच्या लढाऊ परंपरेविषयी माहिती देणारे आठवे प्रकरण समाविष्ट केले होते. अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जातींना लष्करात प्रवेश देऊन ईस्ट इंडिया कंपनीने आणि नंतर ब्रिटीश राज्यकर्त्यांनी त्यांचा गरज भासेल तेव्हा उपयोग करुन घेतला होता आणि गरज संपली की महार पलटणीचे विसर्जनही केले होते. अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जातींनी रणांगणावर गाजवलेले शौर्य आणि निष्ठा लक्षात घेऊन इंग्रज राज्यकर्त्यांनी त्यांना लष्करात पुन्हा प्रवेश द्यावा यासाठी गोपाळबाबा वलंगकर, शिवराम जानबा कांबळे यांच्याप्रमाणेच १९२८ सालानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सतत प्रयत्न केले. त्या प्रयत्नांची ऐतिहासिक पार्श्वभूमी स्पष्ट व्हावी म्हणून चांगदेवराव खैरमोड्यांनी या प्रश्नासंबंधीच्या अस्सल कागदपत्रांचे संकलन करुन जवळजवळ सव्वाशे पानांचे एक प्रकरण लिहिले होते. या प्रकरणात १९७० सालापर्यन्तच्या काळातील महार पलटणीच्या शौर्याची कहाणी खैरमोड्यांनी सांगितली होती.

या विषयाचे महत्त्व लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने डिसेंबर, १९८७ मध्ये मुळातले हे नवव्या खंडातील आठवे प्रकरण स्वतंत्र पुस्तक म्हणून प्रकाशित केले होते. त्याची पहिली आवृत्ती संपल्यामुळे त्याच पुस्तकाची ही दुसरी आवृत्ती वाचकांना उपलब्ध करुन दिली जात आहे. वाचकांना आवडलेल्या या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीसही पूर्वीसारखाच प्रतिसाद मिळेल असे वाटते.

**य. दि. फडके**
अध्यक्ष,
**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.**

मुंबई,
१५ जुलै, १९९१

# प्रस्तावना

कै. चांगदेव खैरमोडे यांनी लिहिलेल्या "अस्पृश्यांचा लष्करी पेशा" या पुस्तकात ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीत असलेल्या महार सैनिकांच्या तुकड्यांचा व इ. स. १९४१ मध्ये उभ्या केलेल्या महार रेजिमेंट मधील महार सैनिकांच्या बहादुरीचा व कर्तव्यपरायणतेचा मानाने उल्लेख केला आहे.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ज्या अनेक लहान मोठ्या लढाया झाल्या त्या सर्व लढायात महार पलटणींनी उल्लेखनीय कर्तबगारी दाखविली हे नमूद करताना मला फार आनंद वाटतो, व महार रेजिमेंटचा पुष्कळ वर्षे कर्नल कमांडंट राहिल्या-कारणाने त्याचा गर्व पण वाटतो.

प्रथम महार रेजिमेंट मध्ये फक्त महार जातीच्या जवानांनाच प्रवेश मिळत असे. पण थोड्याच वर्षात इतर जाती जमातीच्या जवानांना पण प्रवेश मिळू लागला. सुरुवातीला स्पृश्य-अस्पृश्य हा भेदभाव थोड्या प्रमाणांत होता यात काही शंका नव्हती पण फारच लौकर हा भेदभाव नष्ट झाला व आता तर त्याचे नावनिशाणसुद्धा राहिले नाही. ज्या ज्या लढाईत महार पलटणींनी भाग घेतला त्या सर्व लढायात त्या फलटणी तल्या स्पृश्य-अस्पृश्य जवानांनी उत्तम कामगिरी दाखविली. त्यामुळे महार रेजिमेंट नाव भारतीय सैन्यात फार वरच्या दर्जाला पोचले आहे. महार काय किंवा इतर जातींचे जवान काय यांच्यामध्ये आम्ही कसलाही फरक करीत नाही किंवा भेदभाव दाखवीत नाही. आमच्या दृष्टीने महार रेजिमेंट मध्ये नोकरी करणारा मग तो कोणी असो आम्ही त्याला महारच समजतो.

इ. स. १९५० साली उत्तर कोरिया व दक्षिण कोरीया या दोन देशात युद्ध सुरु झाले. उत्तर कोरियाच्या मदतीला चीन व रशिया हे देश आले व दक्षिण कोरियाच्या मदतीला युनायटेड नेशन्सचे प्रचंड सैन्य लढाईत उतरले. ही घनघोर लढाई १९५३ साली थांबली. आणि हिच्यात सुमारे सत्तर हजार चीनी व उत्तर कोरियन सैनिक युनायटेड नेशन कमांडच्या हाती सापडले. तसेच २००-३०० इंग्रज, अमेरिकन व दक्षिण कोरियन सैनिक उत्तर कोरियन सैन्याच्या ताब्यात गेले

लढाई थांबल्यानंतर या युद्धकैद्यांना आपआपल्या देशी पाठविण्याची वेळ आली तेव्हा दोन्ही बाजूच्या या कैद्यांनी स्वदेशी जाण्यास साफ नकार दिला. तेव्हा या कैद्यांचे काय करावयाचे हा प्रश्न उभा राहिला. पुष्कळ वाटाघाटी नंतर Neutral Nations Repatriation Commission व त्यांच्या मदतीला Indian Castodian Force कोरियाला पाठविण्यात आला. त्यांचा कमांडर म्हणून माझी नेमणूक झाली. मी माझ्या पाच हजार सैन्याची जुळवाजुळव करताना तिसऱ्या महार पलटणीच्या "बी" कंपनीचा माझ्या सैन्यात समावेश केला मला सांगावयाला आनंद वाटतो की, या कंपनीने कॅप्टन बक्षी यांच्या अधिपत्याखाली फारच उत्तम कामगिरी केली. त्यांच्या कार्यक्षमतेचे अभिनंदन सर्व राष्ट्रांनी मुक्त कंठाने केले.

या पुस्तकाचे नाव जरी "अस्पृश्यांचा लष्करी पेशा" हे आहे, तरी यात महारांच्या खेरीज इतर अस्पृश्य जमातींचा निर्देश नाही. या इतर जातींचाही विशेषतः मांग, रामोशी व चांभार जातीचा लष्करी पेशाशी संबंध होता. छत्रपती शिवाजी महाराज रामोशी व मांग जातींचा किल्ल्यांच्या बाहेरील परिसराचे संरक्षण करण्यासाठी नेहमी उपयोग करीत. दुसऱ्या महायुद्धात चांभार जमातीची एक फलटण उभी केली होती. तिनेपण चांगली कामगिरी केली होती. एकंदरीत महार, मांग रामोशी व चांभार जातींच्या अस्पृश्यांनी लष्करात ईमाने इतबारे व उल्लेखनीय कामगिरी बजावली यात शंका नाही. त्यांच्या वंशजांना याचा गर्व वाटला पाहिजे.

कोल्हापूर
२४-८-८७

शं. पा. पा. थोरात

# हृदगत्

हे पुस्तक म्हणजे माझे पती श्री. चां. भ. खैरमोडे लिखित डॉ. भीमराव रामजी आंबेडकर यांच्या चरित्र खंड ९ वा, यामधील एक प्रकरण आहे. समग्र चरित्र खंडांची हजारो पाने सर्वसाधारण वाचकांना वाचणे कठीण कर्म आहे. म्हणून महत्त्वाची प्रकरणे जर स्वतंत्रपणे पुस्तिकेच्या रुपाने काढता आली तर त्या त्या विषयांची आवड असणारांना उपयुक्त होतील, ही दृष्टी ठेऊन काही पुस्तिका प्रकाशित करण्याचे ठरविले, त्यापैकी ही एक पुस्तिका प्रकाशित होत आहे.

व्यक्तीला आपले जीवन स्वाभिमानेने, ताठ मानेने जगावेसे वाटते. त्या व्यक्तीला आपल्या पूर्वजांचा, प्रदेशाचा व परिस्थितीचा इतिहास माहीत असणे आवश्यक असते. निकृष्ट परिस्थितीत जेव्हा जगणेच मुष्कील होते तेव्हा इतिहासाचेही त्याचे भान हरपते. पण त्यातूनही एखादा हरीचा लाल जन्म घेतो व परिस्थिती बदलण्याचा जीवापाड प्रयत्न करतो. त्याचे प्रयत्न साकार करण्यासाठी त्या समाजाला, गतेतिहास जाणून घेण्याची जरुरी भासू लागते. गतेतिहासातून स्वाभिमानाचा स्फुलिंग प्रज्वलीत करण्यासाठी सत्याचा शोध घेऊन लेखन करणे आवश्यक असते. याच हेतूने 'अस्पृश्यांचा लष्करी पेशा' ही पुस्तिका लिहिली गेली आहे.

हे प्रकरण स्वतंत्रपणे पुस्तिकेच्या रूपाने प्रकाशित करण्याची (लेखकाच्या इच्छेनुरुप) विनंती मी, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला केली. मंडळाचे माननीय अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी ती मान्य केली.

या विषयाशी तादात्म्य पावलेले व ज्यांच्या लेखनाचा आधार घेतला आहे अशा जनरल एस. पी. पी. थोरातांनी या पुस्तिकेला प्रस्तावना लिहावी अशी मी त्यांना विनंती केली. माननीय श्री. थोरात यांचे वय लक्षात घेऊनही ही कामगिरी त्यांच्यावर सोपविताना खूपच अवघड वाटले. परंतु या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्यास योग्य अशी, त्यांच्या खेरीज अन्य व्यक्ती सुचेचना!

खाल्ल्या मीठाला जागून शौर्य गाजवावे आणि पुढील पिढ्यांना–वंशजांना तोच वारसा ठेवावा व स्वाभिमानाने जगण्याची वाट मोकळी करावी; या हेतूने हे लिखाण केलेले आहे. त्याचा उपयोग समाजाने करून देशहित साधावे आणि आत्मोन्नती करून घ्यावी.

या पुस्तकाच्या व इतर (श्री. खैरमोडे यांच्या लेखनाचे) प्रकाशनांत वेळोवेळी मला पुष्कळांचे मार्गदर्शन घ्यावे लागले. त्यापैकी, प्रा. नलिनी पंडित, डॉ. वि. गो. खोबरेकर, प्रा. डॉ. य. दि. फडके, प्रा. डॉ. पी. टी. बोराळे, श्री. एन. डी. भंडारे, श्री. तु. हि. म्हात्रे, श्री. सु. सोनावणे. इत्यादींचा आवर्जून उल्लेख करायला हवा या व इतर मदतगारांची मी आभारी आहे.

शूर वीरांच्या पराक्रमाची गाथा वाचतांना, वाचणाऱ्यांना व ती श्रवण करणारांना स्फूरण येवो व ते स्वतःच्या व देशाच्या हिताच्या कारणी लागो ही इच्छा व्यक्त करून मी हे हृदगत् संपविते.

'चंचल व्हिला',
१४७–अ, हिंदु कॉलनी, दादर,
मुंबई ४०० ०१४.

११–७–१९८७

द्वारका खैरमोडे

(प्रा. न. र. फाटक यांचे चरित्रकारांचा गौरव करणारे पत्र)

नवी भटवाडी कॉस लेन मुंबई – ४.

ता. ८–५–६५ शनिवार

श्री. चांगदेव भवानराव खैरमोडे यांच्या एकसष्टीच्या समारंभाचा अध्यक्ष म्हणून आपल्या सत्कार समितीने केलेल्या पाचारणाबद्दल मी माझे आभार मनःपूर्वक व्यक्त करतो.

हल्लीच्या जीवनकलहांत प्रत्येकाला साठावे वर्ष संपून एकसष्टावे वर्षात दाखल होण्याचा योग लाभावा ही खरोखरीच अभिनंदन करण्यासारखी घटना असून त्यांचा जाहीर सत्कार करणे हे एक समाजाचे कर्तव्य आहे. त्यातल्या त्यांत श्री. खैरमोडे हे ज्या महाराष्ट्रीय समाजविभागात जन्मले, त्या समाजाची आजतागायतची दुःस्थिती विचारात घेतल्यास ते तर एकसष्टीनिमित्त जास्तच अभिनंदनीय ठरतात. श्री. खैरमोडे यांनी (उच्च) शिक्षण घेतले, निर्वाहाचा व्यवसाय केला, समाजाचा प्रत्येक घटक हेच करतो. परंतु त्यांनी डॉ. भीमराव रामजी आंबेडकर विस्तीर्ण चरित्र लिहिण्याचे काम हाती घेतले हा त्यांच्या आयुष्यातील महत्वाचा भाग आहे व त्याच्या योगाने श्री. खैरमोडे यांचे नाव महाराष्ट्रात चिरस्मरणीय होऊन राहील. त्यांनी लिहिलेले चरित्र हे केवळ आंबेडकर या एका व्यक्तीचे नसून अखिल महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासाचे एक नवे अंग स्पष्टपणे जनतेच्या निदर्शनास आणणारे ते एक महत्कार्य आहे. या चरित्र ग्रंथाचे प्रसिद्ध झालेले खंड जोकोणी आस्थेने दृष्टीखाली घालील त्याला श्री. खैरमोडे यांच्या क्लेशकारक परिश्रमांची सहज कल्पना करता येईल. त्यांत आलेला पत्रव्यवहार हा कालांतराने महाराष्ट्रातील सामाजिक समतेच्या इतिहासाचे बहुमोल साधन समजला जाईल. चरित्रासाठी जवळचा पत्र व्यवहार जतन करणे आणि इतरांचा मिळविणे हे काम सोपे नाही; फार चिकिरीचे, सहनशीलतेचे, सत्व पहाणारे असते. ते काम शक्य तेवढे जास्तीत जास्त श्री. खैरमोडे यांनी पार पाडलेले आहे. त्यांच्या चरित्रलेखनाने मराठी चरित्रसाहित्यात उत्तम प्रकारची भर पडेल यांत संशय नाही.

श्री. खैरमोडे यांच्या लेखनकार्याकडे पाहिले म्हणजे संधी मिळाल्यास जो समाज अस्पृश्यतेच्या शिक्षेने हजारो वर्षे इतर समाजापासून दूर पडला होता, ज्याला विद्येपासून सक्तीने दूर ठेवले होते त्या समाजातील व्यक्ति काय करू शकतात, याचे हे एक डोळ्यात भरण्याजोगे उदाहरण श्री. खैरमोड्यांनी निर्माण केल्याबद्दल शंका राहात नाही. राजकीय गुलामगिरीहून शेकडो पटीने दुर्धर असलेल्या सामाजिक गुलामगिरीने सतत पिडत असलेल्या देशबांधवांचा समूह आता कुठे थोडासा त्या भयंकर गुलाम-गिरीच्या काटेरी बंधनांतून सुटण्याच्या पंथास लागला आहे. ही सुटका निरर्थक नाही.

अशी सुटका देशाच्या एकंदर उत्कर्षाला हातभार लावील. या अवितव्याचे एक प्रसाद-चिन्ह म्हणजे श्री. खैरमोडे यांचे लेखन. त्यांची एकसष्टी गौरवपूर्वक साजरी करणारांत जे तरुण हितकरू असतील त्यांनी श्री. खैरमोडे यांचा कित्ता गिरवण्याचा संकल्प या प्रसंगी करावा. येथे कित्ता म्हटले तो फक्त लेखनाचाच नव्हे. सर्व प्रकारच्या लोकोपयोगी उद्योगाचा कित्ता या शब्दात अंतर्भाव आहे. ज्याचा जो विषय असेल त्याने त्या विषयाची सिद्धी मिळवून तिचा लाभ सामान्य जनतेस देण्याचे ध्येय बाळगावे हा येथे कित्ता गिरविणे या शब्दांचा अर्थ आहे. श्री. खैरमोडे यांनी लेखणीच्याद्वारे लोकसेवा चालविली आहे. विद्यार्थी किंवा विद्यासंपन्नांनी निराळे साधन हाती घ्यावे, पण आपल्यावर समाजाचे ऋण आहे व ते सामाजिक हिताच्या उद्योगाने फेडले पाहिजे हे श्री. खैरमोडे यांच्या कामगिरीचे तात्पर्य आहे.

मी श्री. खैरमोडे यांना आशिर्वाद देतो की, त्यांना उदंड आयुष्य लाभावे, ते आयुष्य सुखाचे, निरोगी आणि कार्यक्षम असावे, त्यांच्या हातून सदैव लोकसेवा होत रहावी; आशीर्वाद दिला, त्याचबरोबर एक लहानशी सूचना करावीशी वाटते की आशीर्वाद उत्तेजन देतो, पण कार्यांचे साफल्य हे ज्याच्या त्याच्या श्रमावर अवलंबून असते हे विसरू नये.

मला उपस्थित राहणे शक्य नाही म्हणून हा लेखन प्रपंच केला आहे. 'जेथे धर्म तेथे जय' न्यायाने जेथे गुणगौरव तेथे मी शरीराने नसलो तरी मनाने उपस्थित आहे असे समजावे. सत्कार समितीने मुंबई मराठी साहित्य संघाच्या सहकार्याची अपेक्षा धरली ती या आशीर्वादाने पूर्ण करावी अशीही एक या आशीर्वादामागे भावना आहे, कळावे.

आपला हितकांक्षी,

न. र. फाटक

# अस्पृश्यांचा लष्करी पेशा

अस्पृश्य समाज मूळचा क्षात्रवृत्तीचा होता. फार प्राचीन काळात त्यांची राज्ये महाराष्ट्रात होती. ती आर्यसंस्कृतीच्या वलाहतवाल्यांनी नष्ट केली, ते बौद्ध धर्माचे अनुयायी होते. बौद्ध धर्म सोडून ब्राह्मणी आर्य धर्म स्वीकारण्याचे यांनी नाकारले. इतरांनी (हल्लीचे मराठे) बौद्ध धर्म सोडून ब्राह्मणी आर्य धर्म स्वीकारला, म्हणून आर्यांनी त्यांना क्षत्रिय वर्णात जागा दिली, असे कांही ग्रंथकारांचे मत आहे. या संदर्भात "The Martial Race of India" by Lieut. General Cir George MacMann, K.C.B., K.C.S.I., D.S.O., Colonel Commandant, The Royal Artillary, या ग्रंथातील खालील उतारा विचार करण्यासारखा आहे :—

"The Maharattas are certain folk of semi-Aryan extraction who own and cultivate the land of the coastal plains and hills north and south of Bombay, the spurs and valleys of the wall of Western Ghats, and the uplands known as the Deccan, more properly Dekhan, and the lower lands and jungles of the Konkan. Because some Aryan or Jat race, because they were men of thaws and hearts and because they were prepared to leave Buddhism, and came back to the Brahmin fold, therefore, they were admitted to have something, it is not quite clear what of Rajput status......

(pp. 97-98) अस्पृश्यांनी बौद्ध धर्म सोडून ब्राह्मणी धर्म स्वीकारण्याचे नाकारल्यानंतर त्यांच्यावर ब्राह्मणी धर्मातील शास्त्रांनी इतकी बंधने लादली की शेवटी ते लोक अस्पृश्य, अदृश्य वगैरे पदाला जाऊन पोहोचले, तरी इमानदारीबद्दल ते मशहूर होते.

आर्य धर्माची सूत्रे हालविणारे ब्राह्मण आणि त्यांच्या तंत्राने चालणारे क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांनी अस्पृश्यांवर जी कडक बंधने घातली व ती पाळण्यासाठी त्यांनी अस्पृश्यांचा जो अनन्वित छळ केला, त्याचा मुख्य हेतू हा की, अस्पृश्यांना उत्पन्नाची सर्व क्षेत्रे बंद करून त्यांना कायमचे दरिद्री करावयाचे व त्यांचे जीवन सर्वस्वी सवर्णांच्या मुठीत ठेवावयाचे; असे झाले म्हणजे अस्पृश्य लोक लाचारीने सवर्णांच्या सेवेत (गुलामगिरीत) जीवन कंठीत राहतील. अशा दुर्धर परिस्थितीला तोंड देऊन अस्पृश्य लोक, मुसलमानांच्या हिंदुस्तानवर स्वाऱ्या होऊ लागण्या अगोदर, हजारो वर्षे आपले लाचारीचे जीवन जगत होते. मुसलमानी सत्तेचा पाया हिंदुस्थानात रुजविण्यास ज्या हिंदूंच्या जाती कारणीभूत झाल्या त्यांत अस्पृश्यांतील जाती, विशेषतः महार, मांग व चांभार यांचा भरणा अधिक होता.

हिंदुधर्मातील चातुर्वर्ण्य सिद्धांताप्रमाणे फक्त क्षत्रियांनी शस्त्रे हाती धरावीत, असा दंडक होता. ब्राह्मण, वैश्य व शूद्र यांना शस्त्रे वापरण्याची मनाई होती. शूद्रातील अतिशूद्र–अस्पृश्य यांनी शस्त्रे घेणे, हे तर महा धर्मभ्रष्टाकार समजले जाई. या धर्मभ्रष्टाकारास शिक्षा देहांताची असे. हिंदुसमाजातील खालच्या थरातील जातींना जर शस्त्रे वापरू दिली तर ते त्यांची उन्नती करून घेतील व अशा तऱ्हेने त्यांचा सामाजिक दर्जाही वाढेल, ही भीती चातुर्वर्ण्याच्या रक्षकांना होती. शूद्र–अतिशूद्र यांच्या हाती शस्त्रे आली तर ते जातिभेदाविरुद्ध सशस्त्र बंड करतील आणि सर्व उच्चवर्णीय हिंदूंचा शिरच्छेद करतील ही या चातुर्वर्ण्य संरक्षकांना जबरदस्त भीती वाटत असल्यामुळे त्यांनी शूद्रातिशूद्रांना शस्त्रे वापरण्याची मनाई करणारे धार्मिक कायदे आपल्या 'स्मृती' मध्ये घातले. त्यांची अंमलबजावणी हिंदुराजे धार्मिक भावनेने करीत होते. मुसलमानांनी हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या, तेव्हा त्यांना शूद्रातिशूद्रांची दैन्यावस्था दिसून आली. या लोकांना आपल्या छत्राखाली आणले तर ते आपल्या साम्राज्यासाठी लढू शकतील, हे त्यांनी हेरले. मुसलमानांनी आपल्या सैन्यात शूद्रातिशूद्रांची भरती केली. या सैनिकांनी मुसलमानी साम्राज्याची पाळेमुळे हिंदुस्थानच्या भूमीत रुजविण्यास मोठ्याप्रमाणात मदत केली. शूद्रातिशूद्रांच्या हातात शस्त्रे आली, ती वंशपरंपरेने तशीच त्यांच्या हातात राहिली. हिंदूंच्या धार्मिक निर्बंधाना ती शस्त्रे शूद्रातिशूद्रांच्या हातातून काढून घेण्याचे सामर्थ्य राहिले नव्हते, कारण ब्राह्मणी धर्माचे पाठीराखे हिंदूराजे इतके समर्थ नव्हते. मराठे आणि पेशवे यांच्या कारकीर्दीत शूद्रातिशूद्रांना शस्त्रे वापरणे आणि समरात लढणे शक्य झाले. याचे कारण मराठे व पेशवे यांना मुसलमान आणि इंग्रज यांच्या-विरुद्ध लढण्यासाठी मोठे मनुष्यबळ हवे होते. मुसलमानांच्या सैन्यावर टेहळणी करणे, किल्ल्यातील लोकांना जळण व गवत-वैरण पुरविणे आणि चोरदरवाजे व गुप्तभुयारे संरक्षण (कोणालाही त्यांची माहिती न देता) करणे वगैरे कामासाठी शिवाजी महाराजांनी महारांचा उपयोग सैन्यातील व शागिर्दपेशातील नोकर म्हणून केला. महारांचा मुसलमानी

सैन्यांत प्रवेश ज्या प्रमाणांत झाला होता तेवढ्या प्रमाणांत मराठ्यांच्या सैन्यांत झालेला नव्हता.

("CHHATRAPATI SHIVAJI employed the MAHARS to watch jungles at foot of the hill forts, act as scouts and kept the forts supplied with wood and fodder. The Mahar recruits came from the provinces of BOMAY Presidency and MADHYA PRADESH". The Regimental History of the MAHAR M.G. Regiment, by *Colonel* Major General S.P.P. Thorat, DSO (1954), page 3).

श्री. छत्रपति शिवाजी महाराज यांनी महारांना जंगलांतील मार्ग, डोंगरकिल्ल्यावर जाणार गुप्त उघड मार्ग यांच्यावर देखरेख करणे आणि डोंगरी गडातील लोकांना जळण व वैरण पुरविणे, या कामावर नेमलेले होते. ही कामे म्हणजे लष्कराच्या संरक्षणाच्या नाड्या होत्या. त्या छत्रपति शिवाजी महाराजांनी महारांच्या हाती दिल्या होत्या. यावरून हे स्पष्ट होते की, महाराज महार जातीच्या इमानदारीची निःशंकपणे कदर करीत होते. याशिवाय गडमाचीवर महारांची वसती ठेवणे, हाही महाराजांनीच पायंडा पाडला. ही अवघड कामे करण्यासाठी महाराजांनी जसे महार कुटुंबांना वडिलोपार्जीत नोकरीवर ठेवले तसेच त्यांनी हजारो महार तरुणांना सैनिक म्हणून रणांगणावर शत्रूविरुद्ध लढविले. परंतु यासंबंधीचे स्पष्ट उल्लेख उच्च वर्णीय बखरकारांनी आपल्या बखरीत केलेले नाहीत. परंतु, महाराजांच्या नंतरच्या मराठेशाहीच्या काळात हजारो महारांनी जे शौर्य गाजविले त्याबद्दल त्यांना ठिकठिकाणी इनामी जमिनी, सरदारकी व पाटीलकी दिल्याचे पुरावे अस्तित्वात असल्याचे दिसून आले. स्पृश्यवर्णीय बखरकारांनी हा महारांच्या बाबतीत जो अन्याय केला, तितक्या तीव्रतेने इंग्रज ग्रंथकारांनी केलेला नाही. कारण, त्यांना ऐतिहासिक दृष्टी होती. आणि ते जरी राज्यकर्ते होते तरी सद्गुणांचे चहाते होते, म्हणून त्यांनी स्वतःच्या इंग्रज लढवय्यांबद्दल जसे साग्र वर्णन केलेले आहे तसे इंग्रजेतर लढवय्यांबद्दल जरी केले नाही, तरी त्यांना अनुल्लेखाने मारलेले नाही. कित्येक महार शूर लढवय्यांबद्दल त्यांनी गौरवपर लिहून ठेवलेले आहे.

लंडनमधील काही व्यापाऱ्यांनी पूर्वेकडील हिंदुस्थान व इतर देश यांच्यात व्यापार करण्यासाठी ' दी कंपनी ऑफ मर्चंटस ऑफ लंडन ट्रेडिंग अन्टू दी ईस्ट इंडिज " या नावाची संस्था स्थापन केली. त्या संस्थेला एलिझाबेथ राणीने ३१ डिसेंबर १६०० रोजी व्यापाराची सनद दिली. कंपनीने हिंदुस्थानात व्यापाराची केंद्रे, सुरत, मुंबई, मद्रास वगैरे ठिकाणी वसविली.

सुरत येथे कारखाना सुरू करण्यासाठी कंपनीला दिल्लीच्या बादशहाने, ११ जानेवारी १६१३ ला कंपनीच्या प्रतिनिधी कॅप्टन बेस्ट याच्या हाती, दिल्ली दरबारात सनद दिली. १६४० पर्यंतच्या काळात कंपनीने मुंबई व मद्रास प्रांतात व्यापाराची केंद्रे

उघडली, मद्रास येथे एक किल्ला बांधण्याची कंपनीने परवानगी मिळविली आणि तेथे 'फोर्ट सेंट जॉर्ज' किल्ला बांधला. कंपनीने बंगालमध्ये कारखाना सुरू करण्यासाठी शहाजहान बादशहाकडून १६३४ साली सनद मिळविली. याप्रमाणे मुंबई, मद्रास व बंगाल या प्रांतात कंपनीने पन्नास वर्षांच्या काळात (१६०१–१६५०) व्यापाराचे जाळे पसरविले. या व्यापाराच्या संरक्षणासाठी कंपनीने लंडनहून आणलेल्या नोकरांना लष्करी शिक्षण देऊन तयार केले. (The Army in India and its Evolution, Government of India Publication, 1924, page 2).

पोर्तुगीज राजाची कन्या 'कॅथेराईन ऑफ ब्रॅगांझा' हिचा विवाह लंडनचा राजा चार्लस याच्याबरोबर १६६२ मध्ये झाला; तेव्हा तिला मुंबई बेट आंदण देण्यात आले. पोर्तुगीज गव्हर्नर आता दुसऱ्या चार्लसचा प्रतिनिधी म्हणून राहू लागला, व त्याच्या दिमतीला युरोपातील बहुवंशीय शिपायांचे सैन्य देण्यात आले. या सर्वांचा खर्च खूप होत असे व त्यातून फायदा काहीच होत नसे. शिवाय मुंबई बेटाचा गव्हर्नर व सुरतेस राहणारा कंपनीचा अध्यक्ष यांच्या आपापल्या हक्क व मानपानाबद्दल नेहमी खटके उडत, प्रत्येकजण म्हणे माझी योग्यता जास्त. या दोघांच्या तक्रारी लंडनला जात. या सर्व कटकटींना लंडनचे राज्यकर्ते व कंपनीचे डायरेक्टर कंटाळून गेले. तेव्हा राजाने मुंबई बेट वर्षाला १० पौंड या दराने कंपनीकडे गहाण ठेवले, कंपनीने मुंबई बेटाचा ताबा २७ मार्च १६६८ ला घेतला, आणि त्याचा कारभार सुरतेच्या अध्यक्षाकडे सोपविला. मुंबईत डेप्युटी गव्हर्नर नेमण्यात आला. राजाचे बेटातील सैनिक कंपनीच्या अधिपत्याखाली आले. २ गनर्स, २१ गोरा, ५ अधिकारी, १३९ शिपाई व ५४ टोपसी असे सैन्य होते. शिपाई युरोपातले होते आणि टोपसी पोर्तुगीज वडील व हिंदी आई यांचे पुत्र होते. कंपनीच्या मालकीची लढाऊ सेना ही अशी अस्तित्वात आली. (कित्ता पान ३)

मुंबईत दोन रजपूत कंपन्या १६८३ मध्ये उभारण्यात आल्या. प्रत्येक कंपनीत एक रजपूत अधिकारी आणि १०० रजपूत शिपाई असत. कंपनीच्या हिंदी सेनेचा पाया हा असा घातला गेला. कंपनीचा एजंट चार्लस आयर याने सुतानुट्टी येथील कंपनीच्या कारखान्यांचे संरक्षण करण्यासाठी किल्ला बांधावयास १६९६ मध्ये नबाबाची संमती मिळविली. तो किल्ला 'फोर्ट विल्यम' या नावाने संबोधण्यात येऊ लागला. लंडनमधील काही व्यापाऱ्यांनी हिंदुस्थानात व्यापार करण्यासाठी दुसरी एक कंपनी काढली व तिला राजाकडून १६९८ ला सनद मिळविली. या कंपनीला पहिल्या कंपनीपेक्षा जास्त सवलती मिळालेल्या होत्या. या दोन कंपन्यांचा हिंदुस्थानात उघड संघर्ष झाला. नंतर त्यातील समजूतदार लोकांनी या दोन कंपन्या एकत्र करण्याची योजना आखली व ती यशस्वी करून १७०८ मध्ये 'युनायटेड कंपनी ऑफ मर्चंट्स ऑफ इंग्लंड ट्रेडिंग टू दी ईस्ट इंडिज' ही कंपनी अस्तित्वात आणली. या कंपनीचे हे भले थोरले नाव मागे पडून प्रचारात 'ईस्ट इंडिया कंपनी' हेच नाव स्थिर झाले. ईस्ट इंडिया कंपनीने

मुंबई, मद्रास व बंगाल यांना इलाख्याचे रूप दिले व प्रत्येक इलाख्यातील व्यापारी-क्षेत्राच्या संरक्षणासाठी सैन्य त्या इलाख्याच्या प्रेसिडेंटच्या अधिपत्याखाली ठेवले. याप्रमाणे कंपनीची इलाख्यातील सेना तयार झाली.

या सेनेत युरोपियन सैनिक व अधिकारी, गोवानीज टोपसी व हिंदी शिपाई यांचा भरणा होता. टोपसी व हिंदी शिपायांचे अधिकारी टोपसी व हिंदीच असत. हे शिपाई आपले कपडे व हत्यारे स्वतःचेच वापरीत असत. कंपनी त्यांना फक्त नक्त पगार देत असे. ( किंग्ज पान ४–५ ). १७४१ मध्ये मुंबईमध्ये एक रेजिमेंट होती. तीमध्ये १३१० टोपसी ( गोवानीज शिपाई ) अकरमासे हिंदी होते. ( किंग्ज पा. ६ ).

कंपनीने प्रत्येक इलाख्यातील सैनेत, घोडदळ, पायदळ आणि तोफखाना वगैरे विभागात जास्त लोकांचा भरणा केला आणि १७४८ मध्ये मेजर स्ट्रिंगर लॉरेन्स याला कंपनीच्या सेनेचा प्रमुख सेनापती (कमांडर-इन चीफ) म्हणून नेमला ( किंग्ज पा. ७–८ ).

युरोपमध्ये आपले वर्चस्व प्रस्थापीत करावे म्हणून इंग्लंड व फ्रान्स हे देश परस्पराशी १७०० ते १७५० च्या काळांत एकसारखे लढत होते. या वेळेस त्यांचे वैमनस्य हिंदुस्थानातही चालू होते. युरोपमधील लढायांसाठी प्रत्येकांना आपापल्या प्रदेशांतील लोकांची सैन्यात भरती करणे भाग पडले. तेथील सैनिक हिंदुस्थानात मोठ्या संख्येने पाठविणे दोन्ही देशांना शक्य नव्हते. अशा परिस्थितीत फ्रेंचांचा हिंदुस्थानातील प्रमुख 'डुप्ले' याने हिंदुस्थानातील आपले वर्चस्व वाढविणे व टिकविणे या उद्देशाने हिंदी लोकांची सैन्यात भरती करण्याची योजना हाती घेतली. त्याने मद्रास प्रांतात मुसलमानांची फलटण १७४८ मध्ये उभारली. (The Armies of India, p. 4 by Major G. F. McMunn 1911) ईस्ट इंडिया कंपनीच्या बंगालमधील सेनापती रॉबर्ट क्लाइव्ह यानेही हिंदी सेना उभारण्याची योजना १७५७ साली हाती घेतली. ज्या पक्षाकडे जास्त हिंदी सैनिक व हत्यारे, तो पक्ष हिंदुस्थानात प्रबळ होणार हे इंग्रज व फ्रेंच या दोघानाही पटलेले होते. म्हणून प्रत्येक पक्षाने हिंदी सैनिकांची आपापल्या सैन्यात भरती करण्याचा सपाटा चालविला. त्यांना नवे गणवेश व पाश्चात्य पद्धतीची हत्यारे देऊन त्यांचा वापर कसा करावयाचा याचे शिक्षणही दिले व त्यांना त्यांत तरबेज केले. (The Army in India and its Evolution, p. 9). १७९६ मध्ये कंपनीच्या सैन्यात १६००० युरोपियन सैनिक व ५७००० हजार हिंदी (बंगाल २४०००, मद्रास २४०००, मुंबई ९००० ) सैनिक होते. ( किंग्ज पा. ११ ) कंपनीने हिंदुस्थानात प्रदेश जिंकणे, आणि जिंकलेल्या प्रदेशावर सत्ता चालविणे, आणखी नवे प्रदेश जिंकणे, या प्रचंड कार्यासाठी कंपनीला, आपल्या सैन्यात वेळोवेळी वाढ करावी लागली. ही वाढ हिंदुस्थानातील सर्व धर्मांच्या व जातींच्या लोकांतून करण्यात आलेली होती. शिवाजी महाराज आपल्या

स्वराज्याच्या स्थापनेसाठी सर्व जातींतील सैनिकांच्या सहाय्याने लष्करी जय मिळवीत होते, तेव्हां ईस्ट इंडिया कंपनीच्या वखारी व कारखाने यांच्या संरक्षणासाठी, लष्करी अधिकारी, हिंदू धर्मातील भरती होण्यास येतील त्या लोकांची आपल्या लष्करात भरती करीत. त्यांच्या बळावर वखारी व कारखान्यांना सुरक्षितता मिळे त्यांच्या लष्करांत जातिभेद फार काटेकोरपणे पाळला जात नसे. मराठे व ब्राह्मण शिपाई, महार शिपायांच्या पंक्तीला बसून जेवत. अंथरुणाला अंथरुण लाऊन झोपत. कंपनीच्या लष्करांत मराठे व ब्राह्मण शिपायांपेक्षा महार शिपायांचा भरणा अधिक होता. महार शिपाई इतरांपेक्षा जास्त लढाऊवृत्तीचे होते, असे त्यावेळच्या लष्करी अधिकाऱ्यांनी लेखी मते प्रगट केली होती.

('5. The rise of MARATHA power under the leadership of Shivaji (1645) coincides with the rising of the first bodies of sepoy troops by the East India Company for the defence of their factories, whilst the MARATHA power embraced all castes and creeds in their army. Writing in the eighteenth century JOHN JACOB could say, "In the Bombay Army, the Brahmin stands shoulder to shoulder in the ranks, nay, sleeps in the same tent with his Purwariee fellow soldier and dreams not of any objection to this arrangement. If this subject be mentioned to a Brahmin sepoy, the ready answer is, "What do I care? Is he not the soldier of the State?" The early Bombay Army of the eighteenth and nineteenth centuries was not predominantly composed of MARATHAS but of MAHARS, RICHARD BURTON himself an officer in a Bombay Regiment at the turn of eighteenth century, took the Parwaree as the typical sepoy" (The Mahar Regiment, p. 3).

शिवाजी महाराजांच्या लष्करात महारांना अस्पृश्य मानले जात नसे. पण पुढे पेशवाईच्या काळात लष्करातील लोकांत उच्चनीच-जातिभेदाचे थैमान जास्त माजले. मराठ्यांच्या पायदळात अस्पृश्य वर्गातील सैनिक होते. या पायदळ सैनिकांना 'पाईक' म्हणून संबोधण्यात येत असे. या पाईकांपैकी जे महार असत त्यांना ('नाईक' किंवा 'नायक'चा अपभ्रंश) 'नाक' हे नावापुढे लावत असत, व जे मांग जातीचे होते त्यांना 'राऊत' हे उपपद लावत असत. मराठ्यांच्या लष्कराच्या तोफा बैलगाडीतून समरांगणावर नेत असत, या तोफा बैलगाडीवर चढविणे, बैलगाड्या समरांगणावर नेणे तेथे तोफांची व्यवस्था लावून त्या डागणे व उडविणे ही कामे महार व मांग पाईकांना नेमून दिलेली होती. पायदळातील स्पृश्य वर्गीय अधिकारी घोड्यावर बसून समरांगणावर जात असत. प्रत्येक अधिकाऱ्याच्या दिमतीला दोन अस्पृश्य पाईक असत. एक घोड्याचा मोतद्दार

व दुसरा घोड्याला दाणाचारा घालणारा. स्पृश्यवर्गीय अधिकारी व सैनिक हे जातिभेदाच्या व उच्चनीचतेच्या भावनेने पछाडलेले होते. ते अस्पृश्य-पाईकांना चांगल्या तऱ्हेने वागवीत नसत. तरीही अस्पृश्य–पाईक ही मानहानी सहन करून तेथेच रहात, नोकरी सोडून जात नसत. कारण, हा एकच त्यांना पोटापाण्याचा व्यवसाय होता आणि ज्यांचे आपण मीठ खातो त्यांच्याकरता आत्मर्पण करण्याची नितिमत्ता अस्पृश्य समाजाच्या 'अंगी बाणलेली होती. शिवाय पायदळातील नोकरी ही महारांची जवळ जवळ वंशपरंपरागत हक्काची बाब झालेली होती. त्यामुळे लष्करी नोकरी म्हणजे अस्पृश्यांची मिराशदारी, असा एक सामाजिक द्वेषभाव रुढमूल झालेला होता. (An impression persists in the minds of many that only the dregs of Indian society would take service as soldiers in the Bombay regiments of the East India Company. And there may be a *prima facie* ground for such an opinion; for in the armies of the Maratha Chiefs all the infantry were men of lower castes and were treaded with disdain. The pure Maratha warrior rode on horse back; and for each horseman there were two foot soldiers, one who attended to the animal and another who cut grass or fodder for it, these foot soldiers or paiks must have been of the Mahar and Mang castes.

The Mahar footman was known as Nak, and the Mang footman as Raut. The Maratha artillery was dragged along by large teams of bullocks, and there many have been room for outcastes by the yokes of those teams. A field officer of the British Army describes the Maratha soldiers of the armies which joined the Bombay Army under Major General Abercomley in the campaign against Seringapatan in 1791. They were remarkably plain but neat in their appearance. Mild in their aspect, humane in their disposition, polite and unaffected in their address, they were distinguished by obedience to their chiefs and attachment to their country...... The Maratha infantry...... is composed of black Christians and despicable poor wretches of the lowest caste, uniform in nothing but the bad taste of their musquets, none of which are either clean or complete; and few are provided with either ammunition or accountrements.

They are commanded by half-caste people of Portuguese and French extraction, who draw off the attention of spectators from the bad clothing of their men by the profusion of antiquated lace of their own........ The Marathas do not appear to treat their infantry with more respect than they deserve, as they ride through them without any ceremony on the march, and on all occasions evidently consider them as foreigners, and a very inferior class of people and troops." (The Mahar Flock, page 59-60).

फ्रॅन्च आणि इंग्रज यांच्या सैन्यात जी भरती होती ती इंग्लंड, फ्रान्स, वगैरे देशांतून हिंदुस्थानांत आलेल्या लोकांची ! यांत दरोडेखोर, खुनी, वगैरे लोक होते. शिक्षा चुकविण्यासाठी ते हिंदुस्थानांत पळून आलेले होते. युरोपियन सेनांच्या पल्टणींतून कांही कारणामुळे परागंदा झालेले लष्करी व आरमारी शिपाई यांचाही भरणा हिंदुस्थानांतील फ्रॅन्च आणि इंग्रज यांच्या पलटणीत होता. ईस्ट इंडिया कंपनीने सर्व जातींच्या लोकांची भरती आपल्या पलटणींत करून घेतली. कंपनीचे अधिकृत लष्कर इ. स. १७५४ सालांत प्रचंड रूपाने उभे केले गेले. (The Armies of India, page 5). १७९६ च्या पूर्वी कंपनीच्या लष्करात हिन्दी लोक बऱ्याच मोठ्या प्रमाणांत मोठ्या जागेवर अधिकारी होते. त्यांच्या हाताखाली काम करणारे युरोपियन अधिकारी व सैनिक हिन्दी अधिकाऱ्यांच्या वर्चस्वाविरुद्ध तक्रारी करीत. १७९६ मध्ये कंपनीच्या लष्करी श्रेष्ठींनी लष्कराची पुनर्रचना करून हे शल्य कमी करण्याचे कार्य केले, ते हिन्दी अधिकाऱ्यांना हळुहळू युरोपियन अधिकाऱ्यांच्या हाताखाली आणणे व हिन्दी अधिकाऱ्यांच्या हाताखाली आणणे, आणि युरोपियन अधिकारी युरोपियन अधिकाऱ्यांच्या हाताखाली आणणे हे होय. या धोरणाला हिन्दी अधिकारी व सैनिकांनी खूप विरोध केला, पण कंपनीच्या लष्करी श्रेष्ठींनी त्यांचा विरोध धाब्यावर बसविला याचा परिणाम हिंदी सैनिकांनी वेल्लोर (मद्रास) येथील लष्करी छावणीत बंड करण्यात झाला. हे बंड कंपनीच्या लष्करी श्रेष्ठींनी मोडले व हिन्दी सैनिक व अधिकारी यांच्यावर कडक नजर ठेवली इ. स. १८२४ मध्ये हे धोरण जाहीर केले व हिंदी सैनिकांना वरच्या (अधिकारांच्या) जागा देण्याचे धोरण रद्द केले यामुळे हिन्दी सैनिकांत असंतोषाचा अग्नि धुमसत राहिला; आणि १८५७ च्या बंडात असंतुष्ट सैनिकांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे भाग घेतला. बंडाचा मोड झाल्यानंतर पार्लमेंटने कंपनीच्या लष्करी अधिकाऱ्यांना धारेवर धरले. हिंदी लष्कराची पुनर्रचना करण्यासाठी शिफारस करण्याचा विचारविनिमय करण्यासाठी पार्लमेंटने 'पील कमिशन' १८५८ मध्ये नेमले. हिंदी सैनिक आणि युरोपियन

सैनिक यांच्या परस्परामधील चालू असलेला द्वेष, संशय वगैरे गोष्टींची जाणीव कमिशनला झाली तेव्हां त्याने हिंदी सैनिकांना, बंदुका, तलवारी व इतर शस्त्रे वापरता येऊ नयेत म्हणून त्यांची भरती अर्टिलरीमध्ये करू नये, अशी एक शिफारस सदर कमिशनने केली. दुसरी शिफारस अशी होती की सैनिकांचे प्रमाण हिंदी २ वं युरोपियन १ (२:१) या प्रमाणात असावे. निरनिराळ्या जातींच्या पलटणी हिंदी अधिकाऱ्यांच्या हाताखाली न ठेवता ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हाताखाली ठेवाव्या म्हणजे निरनिराळ्या जातींच्या पलटणीना परस्परविरुद्ध खेळविण्याचे सूत्र ब्रिटिशांच्या हातात राहील, अशी तीसरी शिफारस होती. ही परिस्थिती पाहून **राजा राम मोहन रॉय** यांनी लष्कराचे हिंदीकरण झाले पाहिजे अशी सरकारकडे मागणी केली. या मागणीला इंडियन नॅशनल काँग्रेसने पहिल्या तीन अधिवेशनांत पाठिंबा दिला. लो. टिळक व नामदार गोखले यांनीहि या मागणीला पाठिंबा दिला होता. पण ब्रिटिश सरकारने या मागणीला संमती दिली नाही. १९१४ ला पहिले जागतिक युद्ध सुरू झाले तेव्हां सरकारला हिंदी लोकांच्या मदतीची गरज वाटू लागली, तेव्हां हिंदी लोकांना वरच्या अधिकाराच्या जागा देण्याचे धोरण त्याने जाहीर केले. (The Rise of The Indian Army — by Victor Longer, The Times of India, 26-1-1969, Page I).

१८५७ साली इंग्रजांचे लष्कर २, ११, ५३८ शिपायांचे होते. (किचा, पा. ३९) त्यांत रजपूत, जाट, मराठे, ब्राह्मण, पठाण, मोगल, गुरखे, शीख, महार, चांभार वगैरे लोक होते. शिखांतील महजबी (झाडूवाले) या अस्पृश्य जमातीने आपल्या लढवय्या वृत्तीने इंग्रजांना फार खूष केले. या **महाजबींनी, गुरु तेगबहादूर** (गुरु गोविंदसिंग नंतरचा दुसरा गुरु) **याचे मुसलमानांनी छिन्न विछिन्न केलेले शरीर, मुसलमानी सैनिकांच्या ताब्यातून, लढून अमृतसरला आणले होते.** (The Armys of India, page 131).

मद्रास प्रांतात मिशनऱ्यांनी ख्रिस्ती केलेले पारिया जातीचे लोक इंग्रजांच्या पलटणीत शिरले. रॉबर्ट क्लाईव्हने ३०० युरोपियन आणि ३०० पारिया सैन्यानिशी अर्काटच्या किल्ल्यावर हल्ला केला आणि प्राणपणाने तो जिंकला. पारिया सैनिक भाताची पेज पीत व युरोपियना सैनिकांना भात खावयास देत अशा रीतीने लढाई यशस्वी केली; अशी आख्यायिका आहे. (The Martial Races of India, pages 144 and 169). महारांच्या अनेक लढवय्यांनी लढायांत मर्दुमकी गाजवून कंपनीच्या लष्करांत अंमलदाराच्या जागा मिळविलेल्या होत्या. १७८७ साली मुंबईच्या पश्चिम समुद्र किनाऱ्यावर जी लढाई झाली तींत मरीन बटालियन मधील हविलदार **मदनाक येसनाक** याने मर्दुमकी गाजविली. म्हणून त्याला जमादार करण्यात आले. त्याच लढाईत **सुबनाक वाडनाक** याने शौर्याची शर्थ केली.

म्हणून त्याला चांदीचा बिल्ला आणि सालखी बक्षीस देण्यात आली, आणि त्याला हविलदार करण्यात आले. १८१० मध्ये इंग्रज व फ्रेंच यांच्या आरमारांची जी लढाई हिंदी महासागरात झाली तीत मरिन बटालियन मधील **धोंडनाक पुलनाक** याने मोठे शौर्य दाखविले. म्हणून त्याला रुप्याचे पदक बक्षीस दिले आणि त्याला लेफ्टनंट हविलदार म्हणून बढती देण्यात आली. ( किन्ता पा. ४ ).

ज्यांच्या नोकरीत महार लोक रहात त्या धन्याशी ते अत्यंत इमानदारीने वागत असत. प्राण संकटात असले तरी ते धन्याशी बेईमान होत नसत. ते शत्रूचे कैदी झाले, आणि त्यांना कितीही मोठी आमिषे दाखविली, किंवा त्यांचा खूप छळ केला तरी ते महार लढवय्ये, शत्रूना सामील होत नसत किंवा शरण जात नसत. याचे एक नमुनेदार उदाहरण, मराठ्यांच्या दुसऱ्या युद्धाच्या वेळी ब्रिटीशांना पहावयास मिळाले. फ्रेंच अधिकारी इंग्रजांच्या सैनिकांना कैदेत चांगले वागवीत. त्यांना चांगले अन्न, कपडे व पैसे देत आणि इंग्रजांची नोकरी सोडून फ्रेंचांची नोकरी पत्करा म्हणून मने वळविण्याचा प्रयत्न करीत. मराठ्यांच्या दुसऱ्या युद्धाचे वेळी फ्रेंचांच्या या आमिषाला पुष्कळ ब्रिटिश सैन्यातील कैदी बळी पडले. आरमारातील आयरीश, मद्रासी व बंगाली लोकही त्याला बळी पडले पण मुंबईचे महार शिपाई पाघळले नाहीत, उलट जे फ्रेंचांचे हस्तक होऊन चांगले कपडे घालून फ्रेंचांचे सैनिक म्हणून मिरवीत होते त्यांना हे मुंबईचे महार कैदी सैनिक उघडपणे शिव्या देत असत. हे स्वाभिमानाचे, महार कैद्यांचे वर्तन पाहून फ्रेंचांनी त्यांचा खूप छळ केला, तेव्हां त्यातील बरेचसे महार सैनिक फ्रेंचांच्या तुरुंगातच मेले. फक्त १२ कैदी जिवंत राहिले. ब्रिटिशांनी जेव्हा फ्रेंचांचा पाडाव केला तेव्हा हे १२ महार सैनिक त्यांना परत मिळाले. ब्रिटिशांनी त्यांचा जाहीरपणे गौरव केला, आणि त्यांना १९१० मध्ये खास पदके बहाल केली ( किन्ता पा. ४५ ).

दुसरे बाजीराव पेशवे आणि इंग्रज यांचे मैत्रीचे संबंध फार दिवस टिकले नाहीत. त्यांच्यातील वैमनस्य काही काळ धुमसत राहिले, आणि शेवटी १८१७ च्या नोव्हेंबरमध्ये त्याचा स्फोट झाला. पेशव्यांच्या सैन्याने इंग्रजांच्या पुण्यातील वकिलातीवर जेव्हां हल्ला केला तेव्हां वकिलातीचे संरक्षण करण्यात कर्नल बर यांनी खूप प्रयत्न केले पण पेशव्यांच्या प्रचंड सेनेपुढे प्रथम त्यांचे प्रयत्न निष्फळ झाले. नंतर इंग्रजांच्या माऱ्यापुढे पेशव्यांचे सैन्य पुण्याच्या उत्तर दिशेकडे पळून गेले. बाजीरावाने सैन्याची नीट जमवाजमव करून पुनः एकदा कर्नल बर याच्या सैन्यावर ( पुण्यातील इंग्रज वकिलातीवर ) हल्ला केला. यावेळी सेकंड बटालियन फर्स्ट रेजिमेंट बॉम्बे नेटिव्ह इन्फंट्री, हिचा मुक्काम पुण्याच्या वायव्येस ३८ मैलावर असलेल्या शिरुर गावात होता. तिचा प्रमुख कॅप्टन फ्रान्सिस स्टॉटन हा होता. कर्नल बरला, पेशव्यांच्या प्रचंड सैन्याला दुसऱ्यांदा तोंड देणे अशक्य वाटल्यामुळे त्याने कॅप्टन स्टॉटनला पुण्याच्या वकिलातीच्या संरक्षणाकरता मदतीस येण्याबद्दल तातडीने संदेश पाठविला. कॅप्टन स्टॉटन शिरुरहून

पुण्याकडे जाण्यास सेकंड बटालियनला घेऊन ३१ डिसेंबर १८१७ ला रात्री ८ वाजता निघाला. हिच्यात बहुसंख्य सैनिक महार होते. कॅप्टन स्टॉंटनबरोबर ५०० पायदळ, ३०० घोडदळ, ५ बटालिन ऑफिसर्स, २०६ पौंडर तोफा आणि त्या चालविणारे २४ ब्रिटिश सैनिक, एवढा लवाजमा होता. सुमारे २५ मैलाचा रात्री प्रवास केला. त्यानंतर ही बटालियन पहाटेस भीमा नदीच्या तीरावर आली. तेव्हा पेशव्यांचे प्रचंड सैन्य नदीच्या दुसऱ्या तीरावर लढाईस सज्ज असलेले दिसले. त्यांच्या सैन्यात ५ हजार पायदळ व २५ हजार घोडदळ होते. पेशव्यांच्या सैन्याने आपणाला खत्म केले तर कर्नल बरला ते खत्म करतील आणि हे पाहून मध्य हिंदुस्थनांतील शिंदे, होळकर व भोसले हे जनरल स्मिथला मोडून टाकतील, आणि यामुळे ब्रिटिश राज्याचा हिंदुस्थानातील पाया उखडला जाईल, हे भविष्य इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांना दिसत होते. म्हणून कॅप्टन स्टॉंटन पेशव्यांच्या सैन्याचा कसा पाडाव करता येईल याचा व्यूह रचीत होता. त्याने पेशव्यांच्या सैन्याला हुलकावण्या देऊन कोरेगांव खेड्यात प्रवेश केला. या गावाला मातीचे कुसू होते. हे कुसू आणि गावातील घरे यामुळे पेशव्यांच्या घोडदळाला गावात शिरून लढाई करणे कठीण होते, हे स्टॉंटने हेरुन, गाव आपल्या ताब्यात घेतला, आणि भीमा नदीच्या किनाऱ्यावर आणि शिरूरला जाणाऱ्या रस्त्यावर, जेथून पेशव्यांच्या सैन्यावर अचूक मारा करता येईल अशा ठिकाणावर त्याने दोन तोफा डागल्या. गावाच्या मध्यभागी जी गढी होती तिच्यावर त्याने तोफ डागली नाही. त्यामुळे पेशव्यांचे सैन्य गावात शिरतांना त्यावर तोफेचे गोळे झाडून तो सैन्याचा ग्रामप्रवेश थांबवू शकला नाही. त्यामुळे गावातील चकमकीत त्याला आपले बरेचसे सैनिक गमवावे लागले. (किस्ता ५–६)

पेशव्यांच्या सैन्यांत अरब, गोसावी आणि मराठे यांचा भरणा होता. तेही चांगले लढवय्ये होते. त्यांच्या माऱ्यापुढे इंग्रज सैनिकानी अनेक वेळा कच खाल्ली. त्यांची झोप उडाली, तहानभूक हरपली आणि ते शत्रूला शरण जाऊं या म्हणून ओरडू लागले. लेफ्टनंट चिशोल्म आणि इतर अधिकारी स्टॉंटनला पुनः पुनः तेच सुचवू लागले. घनघोर युद्धांत तरुण अधिकारी लेफ्टनंट पॅटिन्सन आणि लेफ्टनंट चिशोल्म हे या लढाईत कामी आले. चिशोलमच्या देहाचे शत्रूनी तुकडे तुकडे केले होते. त्याकडे लक्ष वेधवून, स्टॉंटन आपल्या सैनिकांना सांगत होता की तुम्ही जर शत्रूला शरण गेलांत तर तुमचा किती छळ करतील हे तुम्ही या तुकडे करण्यावरुन लक्षांत घ्या व प्राणपणाने लढा; मरण पत्करा पण शरण जाऊ नका. मग इंग्रज सैनिकांनी निकराचे हल्ले चढविले. आणि १ जानेवारी १८१८ ला रात्री ९ वाजता पेशव्यांच्या सैन्याने पळ काढला. इंग्रज सैनिकांनी त्यांचा पाठलाग केला तो भीमा नदीपर्यंत. नदीतील पाणी पिऊन त्यांनी आपली २५ तासांची तहान भागविली. पेशव्यांच्या सैन्याला पळ काढावयास लावणारी जी प्रमुख तुकडी होती ती सर्व महार सैनिकांची होती. त्यांनी आपल्या ४० पट संख्येने असलेल्या पेशव्यांच्या सैन्याला पळवून लावले.

हे महारांचे शौर्य पाहून बाकीच्या, पेशव्यांच्या सैन्याचा धीर खचला व सर्वच सैन्य पळू लागले. इंग्रजांच्या एकंदर ८३४ ( सैनिक व अधिकारी ) लढवय्यांपैकी २७५ लढवय्ये मेले अगर जखमी झाले, आणि पेशव्याचे सुमारे ६०० लोक कामास आले. (किता ६–७)

कोरेगावच्या विजयाबद्दल भीमा नदीच्या तीरावर इंग्रजांनी विजयस्तंभ उभारला. त्यांच्या एका बाजूला जखमी व कामास आलेल्यांची नावे इंग्रजी व मराठी भाषेत कोरलेली आहेत आणि त्याच्या पश्चिमेच्या बाजूवर इंग्रजीत विजय लेख कोरलेला आहे तो असा :–

THIS COLUMN

Is erected to commemorate the defence of Koregam by a Detachment Commanded by Captain Staunton of the Bombay Establishment which was surrounded on the 1st of January 1818 by the Peshwas' whole army under his personal command, and withstood throughout the day a series of the most obstinate and sanguinary assault of his best troops. Captain Staunton, under the most appalling circumstances preserved in his desperate resistance, and seconded by the unconquerable spirit of his detachment, at length achieved the signal discomfiture of the enemy and accomplished one of the proudest triumphs of the British Army in the East.

TO PERPETUATE

The memory of the brave troops in whose heroic firmness and devotion it owes the glory of that day, the British Government has directed the names of their Corps and of the killed and wounded to be inscribed on this monument.

MD CCCXII

(The Mahar M.G. Regiment, Pages 7-8).

इ. स. १८२६ मध्ये काठियावाड, १८४६ मध्ये मुलतान आणि इ.स. १८८० मध्ये कंदाहार येथे ज्या लढाया इंग्रजांनी केल्या त्यांत महार लढवय्यांनी आपल्या शौर्याचा झेंडा उभारला. इ. स. १८८० मध्ये दुसरे अफगाण युद्ध झाले; त्यांत अफगाणिस्थानांत असलेला इंग्रजांच्या 'डुब्रो' येथील तळावर शत्रूंनी हल्ला केला, तेव्हां त्या तळाचे संरक्षण करतांना १९ वी बाँबे इन्फट्री (पायदळ) ने शौर्याची कमाल केली. १९ व्या मुंबई पायदळांत बहुसंख्य लढवय्ये महार होते. या लढाईला १६ एप्रिल १८८० रोजी विशेष रंग आला. तो असा की एका माऱ्याच्या ठिकाणावर शत्रूंनी हल्ला केला, तेव्हां तेथील

इंग्रजसैनिकांनी माघार घेतली. पण त्यातील तिघांनी मात्र पाय रोवून, त्या ठिकाणी शत्रुला तोंड दिले. शत्रूची संख्या ३०० होती. त्या संख्येपुढे या तिघांचा निभाव लागणार नाही म्हणून सहकाऱ्यांनी त्यांना माघार घेण्यास सांगितले. पण ते तिघे शूर वीर जागेवरून हालले नाहीत. त्या तिघांनी तीन तास लढत दिली व तीनशे शत्रूपैकी बऱ्याच जणांना यमसदनास पाठविले. जेव्हां त्यांच्या जवळची काडतुसे संपली तेव्हां ते शत्रूंच्या घोळक्यात शिरून बंदुकीचा उपयोग लाठी सारखा करून शत्रूंना झोडपू लागले. लढता लढता ते धारातीर्थ पडले. ते तीन महावीर म्हणजे मेजर सिडने जेम्स वॉडबी, प्रायव्हेट इलाही बक्ष आणि प्रायव्हेट सोननाक तानताक! (महार, शिवाजी महाराजांच्या सैन्यात होते तेव्हांपासून त्यांच्या नावापुढे नाक हे उपपद लावण्यात येत असे. तीच प्रथा पुढील काळांत इंग्रजी अमदानीतही चालू राहिली.) या शूर वीरांचे स्मृतिचिन्ह म्हणून मुंबईतिल युरोपियन जिमखान्या जवळच्या रस्त्याला 'वॉडबी रोड' हे नाव देण्यांत आले, आणि आलेक्झांड्रा गर्ल्स हायस्कूलच्या भिंतीत एक शिलालेख ठेवण्यांत आला. तो शिलालेख असा :–

"This Road is named after Major Sidney James Waudby, who with Elahi Bux and Private Sonnak Tannak (nak was a characteristic suffix to Mahar names that dates from their service in Shivaji's armies) all of the 19th Bombay Infantry, fell on the 16th April 1880, in fence of Dubro, post in Afganistan which, when warned that an attack in force was imminent, they refused to abandon and most gallantly held for three hours against three hundred of the enemy, many of whom were slain. Eventually when all their ammunition was expended they dashed into the amidst of their foes and died fighting. The odds are even greater than at Koregaon and the heroes were of the same castes, a Europen, a Muslim and the Mahar, who had made up the Bombay Regiments from the start".

(The Mahar MG Regiment, pp. 8-9)

मुंबई इलाख्यांत ईस्ट इंडिया कंपनीने इ. स. १८५७ पर्यन्त आणि त्यानंतर ब्रिटिश सरकारने ज्या लष्करी पलटणी उभारल्या त्यात बहुसंख्य सैनिक महार होते. रत्नागिरी जिल्ह्यातून २१८० महार सैनिक या पलटणींत १८८० च्या अगोदर होते. (किन्ता : ४) इतर जिल्ह्यातूनही महार सैनिकांची संख्या बरीच मोठी होती. या पलटणींची संख्या २९ होती. त्यांच्यांत जी स्थित्यंतरे वेळोवेळी झाली ती अशी :—

| *Previous Name of Unit* | *Present Name of Unit* | *Remarks* |
|---|---|---|
| 1) 1st Bombay Native Infantry | 1) 1st BN The Grenadiers | — |
| 2) 2nd -do- | 2) 2nd -do | — |
| 3) 3rd -do- | 3) 1st BN The Maratha Light Infantry | |
| 4) 4th -do- | 4) 1st BN The Rajputana Rifles | — |
| 5) 5th -do- | 5) 2nd BN The Maratha Light Infantry | — |
| 6) 6th -do- | 6) ...................... | 6) Disbanded |
| 7) 7th -do- | 7) ...................... | 7) Disbanded |
| 8) 8th -do- | 8) 3rd BN the Grenadiers | 8) — |
| 9) 9th -do- | 9) 4th -do- | 9) — |
| 10) 10th -do- | 10) 3rd BN The Maratha Light Infantry | 10) — |
| 11) 11th -do- | 11) 111 Mahars in World War 1914-'18 | 11) Disbanded |
| 12) 12th -do- | 12) ...................... | 12) Disbanded |
| 13) 13th -do- | 13) ...................... | 13) Disbanded |
| 14) 14th -do- | 14) The Maratha Light Inf.-Centre | 14) — |
| 15) 15th -do- | 15) ...................... | 15) Disbanded |
| 16) 16th -do- | 16) 4th BN the Maratha Light Infantry | 16) — |
| 17) 17th -do- | 17) 5th -do- | 17) Disbanded |
| 18) 18th -do- | 18) ...................... | 18) Disbanded |
| 19) 19th -do- | 19) 2nd BN the Jat Regiment | 19) — |
| 20) 20th -do- | 20) 2nd BN Rajputana Rifles | 20) — |
| 21) 21st -do- | 21) (THEN 121st Pioneers) | 21) Disbanded |
| 22) 22nd -do- | 22) 3rd BN The Rajputana Rifles | 22) — |
| 23) 23rd -do- | 23) 4th BN The Rajputana Rifles | 23) — |
| 24) 24th -do- | 24) ...................... | 24) Disbanded |
| 25) 25th -do- | 25) 5th BN The Rajputana Rifles | 25) — |
| 28) 26th -do- | 28) (THEN 128th Pioneers) | 28) — |
| 29) 29th The Bombay Marine BN | 29) ...................... | 29) Disbanded |

(The Mahar MG Regiment Appendix C, page 95)

या सर्व बटालियन्समधून अनेक महार सैनिकांनी निरनिराळ्या रणक्षेत्रात शौर्य गाजविले आणि काही जण उच्च दर्जाचे लष्करी पदावर विराजमान झाले. त्यापैकी काही अधिकाऱ्यांची नावे मी खाली देत आहे.

| | |
|---|---|
| **१) फर्स्ट ग्रेनेडियर बॉंबे इन्फंट्री** | : सुभेदार रगनाक महादनाक, सुभेदार परसनाक, सुभेदार घोडनाक आणि जमेदार गणनाक परसनाक. |
| **२) सेकंड ,, ,, ,,** | सुभेदार मेजर धर्मनाक सवनाक, सुभेदार इट्नाक, सुभेदार हरनाक भागनाक, सुभेदार रगनाक देवनाक, जमेदार भागनाक रंगनाक, जमेदार शिवनाक गोनाक, जमेदार भागनाक व जमेदार इट्नाक. |
| **३) फोर्थ बॉंबे रायफल्स** | : सुभेदार शिवनाक चांगनाक, सुभेदार शिवनाक पांडनाक, सुभेदार रंगनाक आणि बापनाक रंगनाक, जमेदार रंगनाक रूपनाक, जमेदार सुदनाक रामनाक, जमेदार कृष्ट्नाक तुलनाक, जमेदार कृष्णनाक, जमेदार शिवनाक. |
| **४) फिफ्थ बॉंबे लाईट इन्फंट्री** | : सुभेदार चांगनाक रामनाक. |
| **५) सिक्सथ बॉंबे इन्फंट्री** | : सुभेदार मेजर रामनाक नामनाक, सुभेदार मेजर सखनाक, सुभेदार जननाक रामनाक, सुभेदार रंगनाक नामनाक, सुभेदार धर्मनाक रामनाक, सुभेदार रामनाक महादनाक, जमेदार सखनाक रामनाक, जमेदार अर्जुननाक लकनाक, जमेदार लकनाक रामनाक. |
| **६) सेव्हनथ बॉंबे इन्फंट्री** | : **सुभेदार रामनाक मालनाक** (डॉ. आंबेडकरांचे पिताजी), सुभेदार देवनाक चांगनाक, सुभेदार गबोरनाक दादनाक सुभेदार महादनाक मालनाक. |
| **७) एट्थ बॉंबे इफंन्ट्री** | : सुभेदार मेजर चांगनाक, सुभेदार गोंडनाक इट्नाक, सुभेदार सुदनाक, सुभेदार इट्नाक. |

| | |
|---|---|
| ८) नाइन्थ बॉंबे इन्फन्ट्री | : सुभेदार मेजर आणि सरदार बहादूर इट्टनाक भिकनाक, सुभेदार चांगनाक गोंदनाक, जमेदार लकनाक भिकनाक, जमेदार सकनाक भिकनाक, जमेदार इट्टनाक. |
| ९) टेन्थ बॉंबे इन्फट्री | : सुभेदार लकनायक |
| १०) ट्वेल्थ बॉंबे इन्फट्री | : सुभेदार मेजर आणि बहादूर गंगानाक सजानक, सुभेदार केसनाक गोंदनाक. |
| ११) थर्टीन्थ बॉंबे इन्फट्री | : सुभेदार धर्मनाक देवनाक, जमादार ताननाक. |
| १२) फोर्टीन्थ बॉंबे इन्फट्री | : सुभेदार हिरनाक, जमेदार लकनाक सोननाक. |
| १३) फिफ्टीन्थ बॉंबे इन्फन्ट्री | : सुभेदार इट्टनाक लकनाक, जमेदार अर्जुननाक देवनाक, जमेदार धर्मनाक. |
| १४) सेव्हन्टीन्थ बॉंबे इन्फन्ट्री | : सुभेदार भिकनाक जननाक, सुभेदार रुपनाक, सुभेदार बावनाक चांगनाक, सुभेदार गणनाक माननाक, सुभेदार गोणनाक गणनाक, सुभेदार गणनाक बाळनाक, सुभेदार काननाक, सुभेदार माननाक, जमेदार गंगानाक गणनाक. |
| १५) एटीन्थ बॉंबे इन्फन्ट्री | : सुभेदार भिवनाक गोणनाक. |
| १६) नाइन्टीन्थ बॉंबे इन्फन्ट्री | : सुभेदार बहादूर, गंगाराम कृष्णाजी (यांचे आडनाव भातनकर), सुभेदार रामनाक लकनाक, सुभेदार कृष्णनाक बापनाक, सुभेदार सोमनाक जावनाक, सुभेदार रामनाक गंगानाक ( मुलतानच्या लढाईत शौर्य गाजविले. ) सुभेदार इट्टनाक मल्हारनाक, सुभेदार सोमनाक शंकरनाक सुभेदार भागनाक रामनाक, सुभेदार गोंधारनाक काळनाक, जमेदार सोननाक तुलनाक, जमेदार काळनाक, जमेदार इट्टनाक, जमेदार लकनाक, जमेदार जाननाक, जमेदार पांडनाक. |

१७) ट्वेंटिएथ बॉंबे इंन्फट्री : सुभेदार मेजर रामनाक चांगनाक, सुभेदार लकनाक हरनाक (तलवार बहादूर), सुभेदार सोननाक हिरनाक (तलवार बहादूर) सुभेदार सकनाक.

१८) ट्वेंटिफर्सट् मरीन : सुभेदार मेजर दहिवडकर, सुभेदार सुदनाक कमळनाक, सुभेदार देवनाक गोंडनाक, सुभेदार जयनाक हरनाक, सुभेदार रामनाक बननाक, सुभेदार दुलाबनाक, सुभेदार कमळनाक, सुभेदार शिवनाक हिरनाक, सुभेदार जननाक बाळनाक, जमेदार बाळनाक काळनाक, जमेदार जननाक गणनाक, जमेदार गोंडनाक रामनाक, जमेदार बाळनाक रामनाक, जमेदार नारायण, जमेदार सायगांवकर (सॅपर्स अँड मायनर्स ऑर्डर ऑफ मेरिट.)

१९) ट्वेंटी फोर्थ बॉंबे इन्फन्ट्री : सुभेदार येसनाक दादनाक.

२०) ट्वेंटी सिक्सथ बॉंबे इन्फन्ट्री : सुभेदार देवनाक मालनाक.

२१) ट्वेंटी एट्थ बॉम्बे इन्फन्ट्री : सुभेदार माननाक येसनाक, जमेदार अमृतनाक.

(शिवराम जानबा कांबळे-चरित्र, पा. १४७-१४९). ईस्ट इंडिया कंपनीच्या वीस इंन्फट्री रेजिमेंटस आणि एक मरिन कोर यामध्ये आठ सुभेदार मेजर, बत्तीस सुभेदार आणि चौतीस जमादार महार जातीतील होते, अशी माहिती अलेक्झांडर बर्टसन यांनी THE MAHAR FOLK या ग्रंथात (पा. ५९) दिलेली आहे.

ईस्ट इंडिया कंपनीतील शिपाई कमलनाक बिटनाक याला १ जानेवारी १८४७ ला जमेदार म्हणून आणि ५ एप्रिल १८५० ला सुभेदार म्हणून बढती मिळाली, तेव्हा मुंबईच्या गव्हर्नरकडून त्याला जी प्रशंसापत्रे मिळाली ती अशी होती :-

The photostate certificate of the grant of the rank of Jamadar and Subedar to KAMALNAC VITNAC (CUMBLE-NAK WITNAC) are reproduced as under :—

THE GOVERNOR IN COUNCIL OF BOMBAY

The Cumblenac Witnac Greating by Virtue of the power and Authority to us given, We do hereby constitute and

appoint you Cumblenac Witnac to be a Jamadar in the Service of the East India Company, on the Bombay Establishment. You are therefore carefully and diligently to discharge the Duty of Jamadar by doing and performing all and all manner of things there unto belonging; and you are to observe and follow such orders and Directions, from time to time, as you shall receive from us the Governor in Council for the time being or any other your superior officer, according to the Rules and Discipline of War; and you are to rank as Jemadar on the list of Jemadar on the Bombay Establishment, from the First day of January One thousand Eight Hundred and Forty Seven Dated in BOMBAY CASTLE, this first day of June One Thousand Eight hundred and forty seven.

Registered, by Order, in the Secretary's
Office, Military Department — Sd|-
Lieut Col. — Sd|-
Secretary to the Government — Sd|-
Military Department — Sd|-

(The MAHAR MG Regiment, page 91)

THE GOVERNOR IN COUNCIL OF BOMBAY

To Kamalnac Vitnac Greating by Virtue of the Power and Authority to us given we do hereby constitute and appoint you Kamalnac Vitnac to be Subedar in the Service of the East India Company, on the Bombay Establishment. You are therefore carefully and diligently to discharge the Duty of Subedar by doing and performing all and all manner of things thereunto belonging, and you are to observe and follow such Orders and Directions, from time to time as you shall receive from Us the Governor in Council for the time being, or any other your Superior officer, according to the Rules and Discipline of War : and you are to rank as Subedar on the List of Subedar on the Bombay Establishment, from the Fifth day of April One thousand Eight Hundred and Fifty dated in Bombay Castle, This thirtieth Day of December One thousand Eight hundred and Fifty.

to this Government on behalf of the persons of the Mahar and cognate castes in the Satar, but as it was ascertained that the Government of India had decided that men of these castes should no longer be recruited for the Native Army, the petitioners were informed that this Government were unable to interfere on their behalf. It appears, however, to His Excellency the Governor in Council, on further consideration, that there is a serious economic side to the question, and I am desired to communicate the following remarks with regard to it.

"2. A reference to page 1340 of the supplement to the Gazette of India of 1888 will show that the Ratnagiri District, from which the latter petition comes, is generally very infertile and is overpopulated. A considerable proportion of the inhabitants are very poor, and some are unable to earn enough for proper sustenance. The pressure is greatest on these so-called low castes. Now the Army was one of the few careers upon to enterprising men of these classes, and the sudden exclusion of them from it is calculated to inflict a substantial hardship and to give rise to discontent. These remarks are especially applicable to the Ratnagiri District, but are also applicable to the Satara and other districts. I am to add that many pensioned officers of the Mahar and cognate castes have cherished the hope of seeing their sons in their old regiments, and the disappointment caused to them must be severe.

"3. This Government will leave it to the Government of India to decide whether the reasons for prohibiting the enlistment of men of the Mahar and other low castes are sufficiently strong to outweigh the economic consideration in favour of the employment of members of these castes. It is, however, the Governor in Council believes becoming yearly more difficult to obtain recruits in this Presidency from the better Classes of Mahrattas and Musalmans, who in the days of Native rule, constituted the principal elements in the forces of the Native Chiefs. In respect of physique and powers of endurance the men of the low castes, such as

Mahars, Mangs and Ramoshis, are as a rule superior to, whilst, in regard to mere pluck and courage, they are at least the equals of, the bulk of the men of better caste and higher social status, and their loyalty and devotion are unquestioned and have been established incontestably in many historical instances. An admixture of these low caste men in at least some Infantry regiments would appear to be for various reasons distinctly (page 15) advisable. It is understood that the Marine Battalion of Bombay was, when at its best, mainly composed of such men, and many members of these Classes have by good service risen to the higher rank of Native officers."

Sd|-
Secretary to Government.

To

The Commissioner, S.D.,
The Collector of Ratnagiri,
The Deputy Adjuttant General, Bombay Command,
The Commissioner, C.D.,
The Secretary to Government,
Revenue Department,
(with compilation No. 831 of 1895)
The Petitioners (by memorandum)"
(Vol. 77/1896, Rev. Dept., pages 15-16).

Resolution No. 4904, dated 4th November 1896,......... letter from the Secretary to the Government of India No. 2463-B, dated 13th October 1896, *Organization — Native Army*, हे उद्धृत करुन सरकारने गव्हर्नर जनरल इन कौन्सिलचा निर्णय समाविष्ट केलेला आहे की, 'महार वगैरे जातीना लष्करांत प्रवेश देऊ नये' असा जो पूर्वी हुकूम काढलेला होता तो बदलता येत नाही, असे पुन्हा जाहीर केले. (Vol. 77/1896, Rev. Dept., page 19).

लष्कराच्या नोकरीमुळे कित्येक महार व चांभार कुटुंबे सधन, सुशिक्षित व सुसंस्कृत झालेली होती. त्यांच्या वंशपरंपरागत चालत आलेल्या लष्करी पेशाला नष्ट करण्यात आल्यामुळे कित्येक कुटुंबे २०/२५ वर्षात धुळीस मिळाली. कारण या कुटुंबातील

पुरुषांना लष्कराव्यतिरिक्त नोकरी मिळतही नव्हती व मजुरी करणे कमीपणाचे वाटू लागले; ते वडिलोपार्जित मिळकत व मालमत्ता घरी स्वस्त बसून उधळू लागले. ज्यांना पोटासाठी नोकरी करणे भाग होते त्यांना त्यांच्या अस्पृश्यतेमुळे सर्वत्र नोकऱ्या मिळत नसत. कांहीजणांना गोऱ्या अधिकाऱ्यांच्या शिफारशीने जेमतेम कुटुंब चालविता येईल अशा तऱ्हेची खाजगी नोकरी मिळे. त्यांच्यावर अवलंबून राहणाऱ्या नातेवाईकांना गोऱ्या अधिकाऱ्यांकडे बटलर वगैरे सारख्या नोकऱ्या मिळत. या व अशा तऱ्हेच्या नोकऱ्यांमुळे त्यांना आपली आर्थिक परिस्थिती सुधारता आली नाही. त्यामुळे त्यांना शिक्षण व संस्कृती यांना वंचित होऊन हीन दर्जाचे अस्पृश्यतेचे जीवन कंठणे भाग पडले.

अस्पृश्यांच्या लष्कर भरतीवर निर्बंध घातलेल्या या सरकारी अन्यायाविरुद्ध विनंती अर्ज करण्याची चळवळ लष्करांतून कमी केलेल्या लोकांनी व पेन्शनरांनी निरनिराळ्या ठिकाणाहून हाती घेतली. या चळवळीचे प्रमुख सूत्रधार **श्री. गोपाळबाबा वलंगकर** हे होते. त्यांची अल्पशी माहिती मी डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्रच्या पहिल्या खंडात (पान १९८–९९) दिलेली आहे. त्यांनी १८९४ च्या जुलैमध्ये मुंबईच्या गव्हर्नर साहेबांना 'अनार्य दोष परिहारक मंडळ' दापोली, या संस्थेतर्फे अर्ज पाठविला. अस्पृश्य लोकांनी कंपनी सरकारचे राज्य हिंदुस्थानांत स्थापन करण्यासाठी किती त्रास काढले व स्वार्थत्याग केला, याची माहिती देऊन असे सुचविले की, सरकार स्पृश्य वर्गीयांच्या सल्ल्याला बळी पडले, हे त्यास कमीपणाचे होय. सरकारने, अस्पृश्यांची अतुल सेवा लक्षांत घेऊन त्यांना लष्करात पुनः नोकरीस ठेवावे! पण या विनंती-अर्जांना सरकारने किंमत दिली नाही.

यानंतरच्या काळांत अस्पृश्य वर्गाच्या, विशेषतः महारांच्या ज्या सभा होत त्यात लष्करी प्रवेशासंबंधाने विनंती ठराव मंजूर करून सरकारकडे पाठविण्यात येत. या सभांपैकी एक प्रचंड सभा **श्री. शिवराम जानबा कांबळे** यांनी जेजुरी येथे ५ एप्रिल १९१० रोजी पेन्शनर सुभेदार बहादूर **गंगाराम कृष्णाजी भातनकर**, पनवेल, यांच्या अध्यक्षतेखाली भरवून त्या सभेतही उपर्निर्दिष्ट स्वरूपाचा ठराव केला. त्यांनी भारत मंत्री यांना १४ डिसेंबर १९१० ला एक छापील अर्जही पाठविला (खंड १ ला पा. २०१–२९२) या सभांच्यातर्फे पाठविलेल्या विनंती अर्जांनाही सरकारने वाटाण्याच्या अक्षता लावल्या.

१९१४ साली इंग्लंड व जर्मनी यांचे युद्ध सुरू झाले या युद्धात लष्करी नोकर (सैनिक) म्हणून काम करण्याची आम्हाला संधी द्या, अशी अस्पृश्यांनी सभा भरवून ओरड सुरु केली. या सभांपैकी एक जंगी सभा ८ ऑक्टोबर १९१६ ला **बेळगांव** येथे रात्री १० वाजता **श्री. लिंगय्या नायडू** यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यांत आली. **श्री. शिवराम जानबा कांबळे, श्री. गणपत गोविंद रोकडे** (नगर), **रावसाहेब पापण्णा जालिया** (बेळगांव) यांनी डिव्हिजन कमिशनरकडे अर्ज केले.

महारांच्या तीन–चार रेजिमेंटस उभारण्यात अशा तऱ्हेचा प्रचार करणे १९१४ ते १९१६ पर्यन्तच्या महारांच्या चळवळीचे मुख्य सूत्र होते. याच काळांत पहिल्या महायुद्धामध्ये जर्मनीची कांही आघाड्यांवर सरशी होत आहे आणि विशेषतः हिंदुस्थानांतील बहुतेक पलटणी रणांगणावर गेल्या असल्यामुळे हिंदुस्थानच्या संरक्षणासाठी जादा पलटणी उभ्या करणे जरूर पडले; म्हणून सरकारने नव्या पलटणी निर्माण करण्याचे ठरविले. महत्त्वाचे प्रमुख अस्पृश्य समाजसेवक आणि लष्करातील पेन्शनर यांनी १० डिसेंबर १९१६ ला रावबहादूर **आर. जी. नाईक** यांच्या मार्फत एक अर्ज **मि. एल. जे. माऊन्टफोर्ड** कमिशनर मध्य विभाग, यांच्याकडे पाठविला होता. त्याला २५ जानेवारी १९१७ ला उत्तर आले की, अस्पृश्य वर्गातील उमेदवारांना लष्करात भरती होता येते. **महारांना लष्करात घ्यावे, असा हुकूम सरकारने (मुंबई) ६ फेब्रुवारी १९१७ ला काढला.** यानंतर लौकरच महारांच्या (१११ महार बटालियन) दोन पलटणी उभारण्यांत आल्या. मुंबई इलाख्यातील सैन्य भरतीची माहिती सरकारी पत्रकावरून केसरीने ५ मार्च १९१८ च्या अंकात दिली होती ती अशी.

## 'प्रांतिक सैन्य भरती'

गेल्या सहामाहीत सैन्यभरतीच्या प्रांतिक बोर्डाने काय काम केले याची तपशीलवार हकीकत मुंबई सरकारने आपल्या प्रेसनोटमध्ये नुकतीच दिली आहे. हिंदुस्थान सरकारच्या शिफारशीवरून हे बोर्ड स्थापन होण्यापूर्वीच प्रांतिक सरकारने **मि. कॅम्बेल** यांस सैन्यभरतीच्या कामी नेमले होते. बोर्डाची पहिली सभा ता. ७ ऑगस्ट १९१७ ला झाली. त्यापूर्वी सैन्य भरती खाली दिल्याप्रमाणे झाली होती

| मुदत | एकंदर संख्या | फक्त मराठे |
|---|---|---|
| १–८–१९१४ ते ३१–७–१९१५ | ३४६७ | २४७५ |
| १–८–१९१५ ते ३१–७–१९१६ | ४८०१ | ३५४० |
| १–८–१९१६ ते ३१–७ १९१७ | ८२१२ | ६११३ |
| १–८–१९१७ ते ३१–८–१९१८ | २०६२५ | ६६१४ |

पहिल्या तीन संख्यांत कांही, वऱ्हाड व निजामकडील भरती होती. शेवटच्या संख्येत रेल्वे व नाविक कामाकरता लागणाऱ्या कारागिरांचीही गणना आहे. त्या कामी इलाख्याने ४९०० माणसे पुरविली पाहिजेत असा अधिकाऱ्यांचा तगादा आहे. पण इतकी संख्या अजून झाली नाही. सैन्य भरतींत मराठ्यांनीच विशेष भाग घेतला, हे त्यांना भूषणावह आहे. मेसापोटेमियात त्यांची चांगलीच वाहवा झाली. कट येथे जरी त्यांच्यात प्राणहानी पुष्कळ झाली तरी त्या योगाने त्यांच्याकडून होणाऱ्या भरतीत काही न्यून पडले नाही. त्यापैकी पुष्कळसे रत्नागिरी, कुलाबा व सावंतवाडी येथील आहेत. अलीकडे कोल्हापूर व दक्षिण महाराष्ट्रातूनही बरेच मराठे, सैन्यात येऊन मिळाले.

सातारा, पुणे व नगर येथील, आणि एकदा, क्षात्रतेज गाजविलेल्या कुळांतून फारसे मराठे आले नाहीत. इतर जिल्ह्यातून ते फारसे आलेच नाहीत, असे म्हटले तरी चालेल. ३३९० लढाऊ सैनिक दरमहा पुरविले पाहिजेत अशी या इलाख्याकडे सरकारची मागणी आहे, म्हणून सैन्यभरतीचे काम जोराने चालविले पाहिजे. दक्षिणी-मुसलमान तर अगदीच थोडे मिळाले आहेत. कोकणी महारांनी मात्र आपले नाव राखले व त्यांची आता दुसरी पलटण तयार होत आहे. दक्षीणी महार अगदिच थोडे आले. ब्राह्मणांची एक कंपनी फार दिवसांपूर्वीच मंजूर झाली होती, पण त्यांत पुरेसे लोक आले नाहीत. जे आले ते मात्र उत्कृष्ट व चलाख बुद्धीचे आहेत. मेंढाऱ्यांची एक डबल कंपनी तयार झाली असून आणखी एक उभारत आहे. दक्षिणी कोळ्यांनी छत्रपती शिवाजीच्या वेळी आपले क्षात्र तेज चमकाविले होते, व १८५७ च्या बंडाच्या वेळेपर्यंत त्यांचे पुष्कळ लोक लष्करांत होते. पण आता मात्र एका डबल कंपनीची सुद्धा भरती झाली नाही. बेरड, लिंगायत हे अगदी थोडेथोडे येत आहेत. काठेवाडातील एक पलटणहि कदाचित तयार होईल. गुजराथेतून मात्र सैन्यात मजुरांची पुष्कळ भरती झाली आहे. मांग व चांभार यांच्यांत प्रयत्न करून पहावयाचे आहेत. मुंबई इलाख्यापैकी तेलगू मंडळीही एक कंपनी उभारण्याच्या विचारात आहे.

ह्या सैन्यभरतीच्या कामी कोल्हापूरचे महाराज **राजर्षी छत्रपती शाहू** यांनी फार मोठे कार्य केले. त्यांनी त्याबद्दल फार कळकळ दाखविल्यामुळे सरकारने त्यांचे व **कागलकरांचे** अभिनंदन केले आहे. कोल्हापूरहून पुष्कळ लोक मिळाल्यास त्यांची एक पलटणच सरकार मंजूर करील. बिन लढाऊंच्या संख्येत गेल्या तीन महिन्यात सुरतेने पहिला नंबर मिळविला आहे. व याचे श्रेय **मि. कोठवला** यांस आहे. सिंध-मधून लढाऊ लोक फारसे मिळाले नाहीत. पण मजूर मात्र पुष्कळ मिळाले. पंजाब व संयुक्त प्रांताशी तुलना केली तर मुंबई अद्याप फार मागे आहे व म्हणून ह्या पेक्षा अधिक सैन्यभरती त्वरीत व्हावी व इलाख्याचे नाव रहावे, एतदर्थ अधिक प्रयत्न करणे जरूर आहे.' (केसरी, ५-३-१९१८).

पहिल्या महायुद्धांत (१९१४-१८) महार सैनिकांची जी भरती झाली, तिच्या-बद्दलची माहिती The Mahar MG Regiment या ग्रंथात दिलेली आहे ती अशी :-

पहिल्या महायुद्धांच्या प्रारंभीच्या काळात महार लोक पलटणीतील कामगार म्हणून पलटणीत घेतले गेले. अॅडज्युटंट जनरलने २३ जानेवारी १९१७ ला भारत सरकारचे मुख्य चिटणीस यांना कळविले की, महारांच्या दोन खास कंपन्या उभारण्याचे प्रयत्न करणे इष्ट आहे. प्रत्येक कंपनीत २१८ महार सैनिक राहतील. एक कंपनी सिकंदराबादची ६३ वी पायदळ आणि दुसरी कंपनी सेंट थॉमसची ८८ वी पायदळ यांना जोडण्यात येईल. २३ एप्रिल १९१७ पर्यंत २१८ महार पलटणींत आले. याचे श्रेय सैन्य भरतीला जे

लोक मदत करतात त्यांना दिले पाहिजे. या लोकांत **रावबहादूर आर. जी. नाईक एम. बी. ई.** आणि **गणपत गोविंद (रोकडे)** हे प्रमुख आहेत. जुलै १९१७ मध्ये १११ वी महार बटालियन उभारण्यांत आली (पा. १०)

१९१६ व १९१७ सालात दोन महार बटालियन्स उभारण्यांत आल्या. त्यांना वायव्य सरहद्दीवर व त्याही पलीकडे हिंदुस्थानाच्या तिकडील सीमारक्षणासाठी ठेवण्यांत आले. या खडकाळ काटेरी व हिम प्रदेशांत इतर बटालियन्सना चांगला तग धरता आला नव्हता. महार बटालियनने वझिरिस्तानच्या लढ्यांत शौर्याची कमाल केली. पूर्वीच्या ज्या इतर बटालियन्स येथे होत्या त्यांना पठाणांच्या पुढे हात टेकावे लागले होते. पठाणांनी त्यांच्यापासून बंदुका व काडतुसे लुटून नेली होती. महार बटालियन-कडून त्यांना एकही बंदुक लुटता आली नाही.

भारतीयांनी फ्लॅंडर्स, मेसापोटेमिया, पॅलेस्टाईन, आफ्रिकेतील जंगले आणि गॅलिपोलीच्या टेकड्या या रणभूमीवर, पहिल्या महायुद्धांत अतुल पराक्रम केल्यावर अकरा शूर योद्धयांना व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आले. हे क्रॉस पूर्वी हिंदी लढव-य्यांना मिळत नसत. १९१७ सालांत किंग्ज कमिशन हिंदी तरुणांना देण्याचे ठरले, पूर्वी तेही त्यांना मिळत नसे.

१११ वी महार बटालियनला समरांगणांत फार काळ राहता आले नाही. कारण १९१७-१८ च्या काळांत युद्ध बरेच मंदावले होते. तेव्हां १११ व्या महार बटालियन मधील उमद्या सैनिकांना हलक्या कामगारांची कामे करणे भाग पडले. १९२० मध्ये ती पलटण वायव्य सरहद्दीवर सहा महिने होती. त्यानंतर तिची बदली एडनला झाली. येथे ती, ७१ वी पंजाबी बटालियनला जोडण्यांत आली. तिला १९२२ मध्ये एडनहून हिंदुस्थानांत आणून व तिचे विसर्जन करण्यात आले. (It returned to INDIA in 1922 for disbandment, as no place in the post-war army could be found for a single class battalion; especially such a young battalion on untried under a modern war conditions.' The Mahar MG Regiment, page 10). [Colonel Major General S. P. P. Thorat DSO]
महार बटालियन बंद केल्यामुळे लष्करी पेशाचे महार समाजसेवक यांनी या कृत्याबद्दल निषेध व्यक्त करण्याची चळवळ सुरू केली. त्यांनी सभा भरविल्या व सभेतील ठराव मुंबईचे गव्हर्नर साहेब व मिलिटरी ऑफिसर्स यांच्याकडे पाठविण्याचा सपाटा चालविला.

**श्री. गणपत गोविंद रोकडे** हे मिलिटरी अकौन्टस खात्यांत अहमदनगर येथे नोकरीवर होते, त्यांनी कांही लोकांच्या साहाय्याने एक अर्ज (इंग्रजी) छापून घेऊन तो हिंदुस्थानचे सेनापति, सिमला यांना १० ऑगस्ट १९२२ ला पाठविला, त्यांत त्यांनी १११ महार बटालियनच्या गौरवपर कार्याचा उल्लेख केला आहे. ती माहिती अशी :

१) १११ महार बटालियनला १९१७ ते १९२२ च्या काळात १४ ठिकाणी लढाऊ व बिन लढाऊ कामें करावी लागली.

२) १९१४–१८ या काळांत महार तरुणांना प्रायनीर्स, म्यूल कार्प्स, आर. ए. डेपो, एस. अँड टी. कोर, एम. डब्ल्यू. एस; लेबर कोअर, गोऱ्या अधिकाऱ्यांचे खाजगी नोकर म्हणून लष्करी पेशांतील निरनिराळ्या रेजिमेंट्समध्ये प्रवेश मिळाला. त्यांनी दिलेली आपापली कर्तव्यकर्में चोख बजावली, व ती बजावीत असतांना कित्येकांनी प्राणार्पण केले. (३) १११ व्या महार बटालियनने झोब, वझिरीस्तान वगैरे ठिकाणी पराक्रमाची कामें केली. याबद्दलचे लष्करी खात्याच्या दफ्तरातील काही पुरावे असे आहेत.

(Extracts from correspondence on Mahar Battalion).

'Farewell message of the Commandant Zhob Forces, wherein the 111th Mahars were serving :

Head Quarters, Zhob, Zoralai. No. 23/497Z.O.

Dated, at Zoralai, 7th October 1920.

On the departure of the 111th Mahars from Zhob Forces, the Commandant, Zhob, wishes to thank Lieut. Colonel Dyke, the British and Indian Officers, N.C.O.s and men of the Battalion for the good work they have done during the time they formed part of the Zhob Force.

It is entirely due to the energy and hard-work 111th Mahars that the Murgha-Lakaband Sector has become a model Sector of the Harnai Fort, Sandeman line.

Although frontier conditions were at the outset strange to the personnel of the Battalion, officers and men quickly adapted themselves to their new surroundings and by their determination and hard work rapidly assimilated the Special training requisite for Mountain Warfare.

The Lakaband Column has during the past summer been of the greatest value to Zhob Force safeguarding the raiders routes from Zhob towards Murgha and Musa Khel. This detachment has made for itself a name in the Lakaband are a where the inhabitants have learnt to show the greatest respect of the 111th Mahars.

The attitude of a small picketting party suddenly attacked near Zorazai showed that the Regiment is imbued with the spirit of the offensive.

The Commandant, Zhob, bids farewell to the Mahars with regret at their leaving his Command and wishes all ranks God speed and the best of luck in Mesopotemia.

Sd|- W. W. Brindley, Captain'.

Letter, No. 23|50|Z.O., dated 7th October 1920, from the Commanding Head Quarters, Zhob, Zororai to the General Staff, 2nd Indian Division, Quetta.

'On the departure of the 111th Mahars from Zhob, I wish to bring forward to the notice of the G.O.C., 2nd Indian Division, the excellent behaviour of this Battalion.

The Battalion has suddenly brought from the peaceful life of a down country station to the semi-war condition of the Indian Borderland. All ranks have shown the greatest energy and determination to assimilate frontier conditions.

The Battalion has proved itself imbued with the proper offensive spirit by the single instance when a weak detachment proceeding enroute picketting (picquetting) duty was suddenly attached by outlaws. The N.C.O. in charge immediately fixed bayonets, charged and routed their assaultants who were numerically superior to them. The Battalion seized every opportunity to make itself really efficient fighting Unit and benefitted much by forming its one Mountain Warfare School at Lakaband.

The 111th Mahars have improved the Lakaband-Murgha Sector very much. The posts are now clear, comfortable and securely wired, Murgha Post and surroundings are now clean and complete with facilities for the training and comforts of soldiers (e.g. Musketry, Range, Bothing Pool, etc.) which have been construed entirely by the Battalion.

The excellent marching power of the Battalion has been shown by the frequent operations carried out by the

Lakaband column by day and by night. The good state of discipline is evident from the behaviour of the smallest detachment along the road.

I am indebted to Lieut. Colonel Dyke, Captain Grant M.C. and Leiut. Boyce, M.C., M.M., for the way in which they have worked and made the Battalion into a good fighting Unit which has, during its tour in Zhob turned the attitude of the inhabitants from what at the outset was bordering on contempt into, as it is now, one of deep respect.

Sd|- D. Baird, Colonel
Commanding Zhob.'

—x—

Letter, No. 353/8-G.S., dated 26th October 1920, from G.O.C. 2nd Indian Division, to the General of the Staff, Poona, Distt. No. 11965|10|G of 1-11-1920.

"I have great pleasure in forwarding a report by the Commandant : Zhob, the excellent behaviour of the 111th Mahars while servicing under my Command.

I had opportunity while touring recently in the Zhob of testing thoroughly, the possibilities of this Battalion and fully endorse all the Colonel Baird says of their soldierly spirit and high standard of military efficiency.

The three officers mentioned by Colonel Baird have done sterling work, both which in Zhob and in producing this satisfactory work.

Sd|- A. Campbell
Major General Commanding,
2nd Indian Division."

श्री. रोकडे यांनी आपल्या १०-८-१९२२ च्या अर्जासोबत श्री. शिवराम जानबा कांबळे यांच्या १४ डिसेंबर १९१० च्या छापील अर्जाची प्रत पाठविली होती. रोकडे यांनी सदर अर्ज मध्य विभागाचे रेव्हेन्यू कमिशनर, मि. एल. जे. माउंटफोर्ड यांच्या

मार्फत सरसेनापतींकडे पाठवितांना जो शेरा दिला त्यातील १११ वी महार बटालियन ठेवण्याबद्दलचा भाग असा होता.

"According to the Officer Commanding, the Regiment has shaped well. It is free from all political_influences. It is animated by a spirit to do well so as to justify the claim of the untouchables to respect in the eyes of other castes and it bears with it the traditions of the memories of the 2nd Battalion of the First Regiment, afterwards the 1st Grenadiers who fought and died for us at Koregaon in 1818. I can see nothing more calculated to uplift the low caste Mahars than the retention of the Regiment." (Revenue Commissioner, Montford's recommendation to Govt. of India on Mahar appeal to retain Mahar Battalion)

१११ वी महार बटालियनचे विसर्जन करू नये, या संबंधात दुसरा अर्ज सर. सेनापतींना २८ ऑगस्ट १९२२ ला **रावबहादूर आर. जी. नाईक, श्री. लिंगय्य-नायडू** आणि **श्री. पापन्ना जालिया थद्ये** यांनी बेळगांवहून दक्षिण विभागाचे कमिशनर **मि. पी. आर कॅडेल** (C.S.I., C.I.E., I.C.S.) यांच्या मार्फत पाठविला. कमिशनरांनी या प्रश्नासंबंधी पूर्वी ज्या सभा भरविल्या होत्या त्या संबंधी अनुकूल मत प्रदर्शित केलेले होते. ३१-१२-१९२१ ला भरलेल्या बेळगांवातील सभेची त्यांनी असे मत प्रदर्शित केले की, महार, या सरकारबद्दल राजनिष्ठ आहेत व त्यांना पलटण चालू ठेवणे हे सरकारचे कर्तव्य आहे. ['The Mahars have been proverbial for their loyalty to the existing Government and such a body of men can be absolutely relied upon'. (Speech of P. R. Cadel, Governor of Bombay, at Belgaum Mahar meeting on 28-8-1922)].

या अर्जांना १३-९-१९२२ चे [No. A|15369|1 (A.G.6), Army Head Quarters, India, Adjustant General's Branch Simla]. ॲडज्युटंट जनरलने उत्तर पाठविले की, महार १११ व्या पलटणीबद्दल जो सरकारने पूर्वी निर्णय घेतलेला आहे तो बदलता येत नाही. फर्स्ट सॅपर्स ॲंड मायनर्स यांत ड्रायव्हर्स म्हणून आणि इंडियन सिग्नल कोअरमध्ये महार उमेदवारांना नोकऱ्या मिळतील. परंतु या दिलेल्या वचनाप्रमाणे महारांना लष्करी पेशांत प्रवेश मिळाला नाही. या प्रमाणे अस्पृश्यांच्या लष्करी पेशाचा तात्पुरता का होईना शेवट झाला.

दिल्लीतील मध्यवर्ती कायदेमंडळांत १४ मार्च १९२५ ला अर्थ मंत्री ऑ. सर आलेक्झांडर मुडियम यांनी जाहीर केले की, हिंदी तरुणांची लष्करात जास्त प्रमाणात

भरती व्हावी व त्याबद्दल त्यांना हिंदुस्थानातच शिक्षण देण्याचे कॉलेज सुरू करावे, या बद्दल विचार विनिमय करण्यासाठी भारत सरकार, एक मंडळ नेमण्याचा विचार करीत आहे त्यानंतर जूनमध्ये हे मंडळ नेमण्यांत आले. ते इंडियन सँधर्स्ट ( अगर स्कीन ) कमिटी या नावाने प्रसिद्ध आहे. त्याचे अध्यक्ष लेफ्टनंट जनरल सर अँड्रयू स्कीन के. सी. बी., के. सी. आय. ई., एम. जी , चीफ ऑफ. दी जनरल स्टाफ, आणि सभासद :- १) पंडित मोतीलाल नेहरू एम. एल.ई. २) श्री. एम.ए. जीना एम. एल.ए ३) ऑनरेबल सरदार जोगेंद्र सिंग, मिनिस्टर ऑफ ॲग्रिकल्चर, पंजाब सरकार ४) दी ऑनरेबल सर फिरोज सेटना, मेंबर ऑफ दी कौन्सिल ऑफ स्टेट, ५) दिवाण बहादूर रामचंद्रराव एम. एल. ए. ६) नबाब सर साहिबझादा अब्दुल क्वायूम सी. सी. आय. ई , एम. एल. ए. ७) सुभेदार मेजर अँड ऑनररी कॅप्टन हिरा सिंग, सरदार बहादूर एम. बी. ई., एम. एल. ए. (१६ वी रजपूत) ८) डॉ. झियाउद्दीन अहमद, सी. आय. ई., एम. एल. सी., प्रोव्हाईस चॅन्सलर, अलिगड मुस्लिम युनिव्हर्सिटी; ९) कॅप्टन जे. एन. बानर्जी, बार-अॅट-लॉ, १०) मेजर ठाकूर झोरावर सिंग, एम. सी. चीफ सेक्रेटरी कौन्सिल ऑफ ॲडमिनिस्ट्रेशन, भावनगर स्टेट (हिंदी संस्थानचा प्रतिनिधी) ११) रिसा-लदार मेजर अँड ऑनररी कॅप्टन हाजी गुलनवाज खान, सरदार बहादूर (१८ वी लान्सर) १२) मेजर बाळासाहेब डफळे, ७ वी रजपूत रेजिमेंट, आणि (१३) मि. ई. बर्डन, सी. एस. आय., सी. आय. ई., आय. सी. एस, सेक्रेटरी टू दी गव्हर्नमेन्ट ऑफ इंडिया इन दी आर्मी डिपार्टमेन्ट हे होते. पं. मोतीलाल नेहरूंनी ११ मार्च १९२६ ला राजीनामा दिला. या मंडळाने ज्या शिफारसी केल्या त्यातूनच डेहराडूनला मिलिटरी कॉलेज, (The Prince of Wales' Royal Indian Military College, Dehra Dun) पुढे काढण्यांत आले. १९१८ च्या पूर्वी हिंदी माणसाला किंग्ज कमिशन देण्यांत येत नसे. ते फक्त गोऱ्या लोकांना दिले जात होते. दुसऱ्या महायुद्धांत हिंदी लोकांना सुरवातीला 'व्हाईसरॉयज' व नंतर 'किंग्ज' कमिशन देण्यांत येऊ लागले. (Report of the Indian Sandhurst Committee. 1927).

या कमिटीच्या शिफारसी हिंदी समाजातील सुस्थितितील हिंदु व इतर जमातीतील तरुणांना अधिकारी म्हणून निर्माण करणे, याकडे दृष्टी ठेवून केलेल्या होत्या. अस्पृश्य समाजांतील लोकांच्या लढाऊ वृत्तीला या कमिटीने मुळीच महत्त्व न दिल्यामुळे अस्पृश्यांना लष्करांत प्रवेश मिळावा व त्यांच्यातून लष्करी अधिकारी निर्माण व्हावेत या संबंधी कमिटीने अहवालांत एक चकार शब्दही लिहिला नाही.

सरकार अस्पृश्यांच्या लष्कर भरतीस उत्तेजन देत नाही, हे पाहून अस्पृश्यांचे समाजसेवक व मिलिटरी पेन्शनर्स यांना फारच वाईट वाटले; परंतु त्यांनी पुनः पुन्हा प्रयत्न करण्याचे आपले व्रत सोडले नाही. ते एकसारखे सभा भरवून ठराव पास करून ते वरिष्ठांकडे पाठवीत असत. अशी मिलिटरी पेन्शनर्सची एक

सभा ता. ८–६–१९२८ ला दामोदर हॉल, परळ, मुंबई येथे भरली होती. या सभेचे अध्यक्ष **डॉ. बाबासाहेब आंबेडकर,** होते. यात पेन्शनर्सनी महारांना मिलिटरीत भरती करवून पेन्शनबद्दलची मोठी कळकळीची व सरकारची अवज्ञा करणारी भाषणे झाली. नंतर बाबासाहेबांचे भाषण झाले. त्यांनी आपल्या भाषणात, सरकारच्या कृतघ्नपणाचा इतिहास सांगून सरकारच्या धोरणावर प्रखर टीका केली. याबाबतीत सर सेनापतीकडे एक शिष्टमंडळ नेण्यात यावे; असा ठराव या सभेत मंजूर करण्यात आला. पण असे शिष्टमंडळ निर्माण झाले नाही आणि सरसेनापतीकडेही गेले नाही.

सारांश, महार सैनिकांनी रणक्षेत्रांत अद्‌भूत पराक्रम केले व ब्रिटिशांचे साम्राज्य भारतात वाढविण्यास इतर जातीतील हिंदी सैनिकांपेक्षा कणभर जास्तच प्रयत्न केले; परंतु संपूर्ण हिंदू सैनिक व अधिकारी यांच्यातील जातिभेदाच्या द्वेषाग्नीपुढे ब्रिटिशांना महार वीरांना थारा देणे दुरापास्त झाले. केवळ ब्रिटिश साम्राज्यात १८५७ ची द्वितीय आवृत्ति, महार व चांभार सैनिकांच्या लष्करातील अस्तित्वामुळे होऊ नये, हीच भावना राज्यकर्त्यांची असल्यामुळे त्यांनी अस्पृश्यांना लष्करात भरती देणे बंद केले.

('There are no Mahars in the Indian Army now, unless they be employed as *sais* in the field of artillery or as motor mechanics in the armoured car units. But an attempt was made during the great world war to embody a battalion of such men. The response to the recruiting officer was slow, present case as in the past who enlisted. Two companies of them were trained alongside of two companies of Punjab Christians. They formed 71st - 111th Regiment; but they were not required on any battlefield though they attained a high standard of discipline and of athletic efficiency. In education and in physique the two wings of the regiment were unequal. It is significant that the Army could find comradeship for the Mahars only among Christians. The regiment was disbanded at the end of the war.

Well, may a disinterested student of Indian History ask. Why did the Bombay regiments cease to recruit Mahars? The answer which comes most readily to mind is that caste prejudice on the part of Maratha soldiers made it difficult to maintain discipline and *esprit de corps* and commissariat efficiency in a complex modern army, if untouchables be in the ranks. But the easy and obvious answer is not the whole truth; and the spirit of history demands that the truth be faced.

The facing of the truth demands a retrospective of the history of the Bombay regiments. ....What European Officers of the Company's service in 1796 did to Indian officers of that time, King's Army Officers at a later period did to the Company's officers. That is to say, the amount of military service may have increased in India, but the amount of understanding in the Sepoy mind did not increase; and there was a dwindling number of Indian officers who had reason to be proud of their British connection. Wise soldier-statesmen like the friends, Sir Thomas Munrao and Sir John Malcum, both of whom began their Indian career before they were twenty years of age, and advanced through labour and fighting from rank to rank until they were Governors of Madras and Bombay respectively, foresaw this trend of military officers had protested vigorously against the superseding of responsible and honourable Indian officers. There seems to be little about that if the temper of such statesmen, their manners and their sympathetic understanding of the mind of the Indian people, had been copied and the Sepoy revolt of 1857 might have never been happened.

While changes were taking place in the Commissioned ranks of the India regiments, there was going on a change in the *esprit de Corps* of those regiments. It has always been the policy of officers of the Bombay regiments to have men of a number of castes in their ranks. During the war with the Peshwa there was a marked increased in the proportion of Rajput and Hindustani Sepoys in the Bombay regiments, and after the defeat of the Peshwa the Bombay Army came more and more into touch with the northern regiments. In the Hindustani regiments the men put caste before the regiment. In the old Bombay units soldiers belonged to a regiment rather than to caste. As the change in the character and the experience of the officers was taking place, there was working in the Bombay regiments a change of devotion from the corps to caste. This was almost inevitable since the war-like classes who used to form both an army and a caste must needs find employment in Bombay units.

Along this line of study will be found the main reason for the exclusion of Mahars from the ranks of Bombay regiments when after 1857 the Imperial Government found it desirable for reasons of economy and of military policy to reduce the number of Indian regiments.

Furthermore there happened in the Civil Government a process parallel to that which occurred in the Bombay Army. The direct officer who does the real work of administration and who knows the people because he moves among them and listens to their petitions, has occasion to appreciate the local knowledge possessed by the Mahar and his mental quickness. But there has been a tendency to honour the Secretariate staff more than the man in the district. The officer who spends his days sitting at a bureau cannot be expected to see any political power in a caste of field labourers and weavers and village messengers and masons and roadmakers, even though they have a fine military record. One has heard over and over again the remark that the Mahar has no political significance. The remark just prove that the maker of it has little memory and little understanding of such events as the battle of Koregaon. The mind which suffers from such frailties is hardly fitted to retain the empire given to it.

But circumstances are changing rapidly in the political world, and rival communities, Moslems, Hindus, Sikhs see in the Mahar vote something of potential value when the form of Government is democratic.

Mahar Sepoys had not a little to do with the establishment of British dominion in India, as Mahar servants had not a little to do with the possibility of European domestic life in India. The British failure to remember this may not be a cause or even an occasion, but it is manifestly a concomitant of the decline of that dominion. (The Mahar Folk, page 63-66).

१९२३ ते १९२६ पर्यंतच्या काळांत महार मिलिटरी पेन्शनर्स आणि समाजसेवक यांनी अस्पृश्यावरील प्रवेशबंदी दूर करा अशा अर्थाचे अनेक विनंती अर्ज मुंबई व मध्यवर्ती सरकार यांच्याकडे पाठविले. परंतु त्यातून कांही निष्पन्न झाले नाही.

लष्करी नोकरी ही अस्पृश्यांच्या उपजिविकेचे आणि सामाजिक प्रतिष्ठा (दर्जा) वाढविण्याचे दुहेरी साधन आहे, हे बाबासाहेब खाजगी बैठकीतून बोलत असत. समाजातील लोकांच्या तुटपुंज्या धडपडीकडेही त्यांचे लक्ष होते. हे दुहेरी साधन अस्पृश्यांना कशा रीतीने उपलब्ध करून देता येईल याबद्दल त्यांचे त्या बाबतीत सखोल चिंतन चालले होते. ते उपलब्ध करून देणे, हे एक त्यांनी आपल्या आयुष्याचे ध्येय ठरविलेले होते. म्हणून त्यांना जेव्हां जेव्हां व जेथे जेथे या बाबतीत उघड वा आडून प्रयत्न करण्याचे प्रसंग मिळत तेव्हां ते त्यांचा चांगला उपयोग करीत असत. त्यांच्या या प्रयत्नांना १९४२ साली यश मिळाले. त्याबद्दलचा इतिहास पुढे येईलच.

१९१७ सालांत किंग्ज कमिशन हिंदी तरुणाना देण्याचे ठरल्यानंतर त्यांच्यासाठी सँढर्स्ट येथील लष्करी कॉलेजमध्ये दहा जागा राखून ठेवल्या. एस्थर कमिटी रिपोर्ट १९१९ ला प्रसिद्ध झाला, त्यांत हिंदी लष्करासंबंधी बऱ्याच उत्तेजक शिफारशी केल्या होत्या. त्यांच्यावर मार्च १९२१ मध्ये मध्यवर्ती कायदे मंडळाल चर्चा झाली तेव्हां सर पी. सी. शिवस्वामी अय्यर यांनी अनेक ठराव मांडून हिंदी लष्कराला प्राधान्य देण्यासंबंधी व भारतीयांच्या अधिकारात सैन्य यावे, अशी मागणी केली. याचा परिणाम असा झाला की घोडदळ व पायदळ यांच्या आठ तुकड्या १८२३ ला सर्वस्वी भारतीयांच्याच उभारण्यात आल्या. स्कीन कमिटीचा रिपोर्ट १९२५ मध्ये प्रसिद्ध झाला. या कमिटीवर बॅ. जीना व मोतीलाल नेहरू होते. यांच्या प्रयत्नांनी भारतीय लष्कराचे भारतीयकरण व्हावे, मिलिटरी कॉलेज सुरू व्हावे, वगैरे शिफारशी कमिटीने केल्या. पण सरकारने त्या स्विकारल्या नाहीत. सरकारने सँढर्स्टमध्ये २० जागा भारतीयांसाठी राखून ठेवल्या. पहिल्या राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या डिफेन्स सबकमिटीवर तेजबहादूर सप्रू, श्रीनिवास शास्त्री, फिरोज सेठना, बॅ. जयकर, डॉ. मुंजे व बॅ. जीना होते. त्यांनी लष्कराचे भारतीयकरण व्हावे म्हणून खूप खटपट केली. पण ब्रिटिश सरकारने डेहराडून येथे इंडियन मिलीटरी ॲकॅडमी सुरू करून बाकीच्या शिफारशींकडे काना डोळा केला.

(The Rise of Indian Army, by Victor Longer, The Times of India Magazine, 26-1-1969, page I).

सरकार अस्पृश्यांच्या लष्कर भरतीला उत्तेजन देत नाही हे पाहून अस्पृश्यांचे समाजसेवक व लष्करी पेन्शनर्स यांना फार वाईट वाटले. तथापी त्यांनी पुनः पुनः प्रयत्न करण्याचे व्रत सोडले नाही. ते अनेक सभेमधून सरकारला ठरावांचे द्वारे विनंती करीतच असत. अशी मिलिटरी पेन्शनर्सची एक सभा ८-६-१९२८ ला रात्री ७-३० वाजता मुंबईला परळ येथे दामोदर हॉलमध्ये **बाबासाहेब आंबेडकरांच्या**

अध्यक्षतेखाली भरली होती. या सभेत जी भाषणे झाली ती सरकार बद्दल मोठी आस्थेची व राजनिष्ठा दाखवून ! मात्र बाबासाहेबांनी आपल्या भाषणात सरकारच्या कृतघ्नपणाचा इतिहास सांगून सरकारच्या धोरणावर कडक टीका केली. या बाबतीत सरसेनापतीकडे एक शिष्टमंडळ न्यावे असा ठराव या सभेत मंजूर करण्यात आला, पण असे शिष्टमंडळ अस्तित्वात आलेच नाही.

बाबासाहेब हिंदी वर्तुळ परिषदेसाठी १९३० साली गेले तेव्हापासून त्यांना अस्पृश्यांच्या लष्कर भरती संबंधीच्या धोरणात बदल कसा घडवून आणता येईल, याबद्दल लंडनमधील अनेक रिटायर्ड मिलिटरी ऑफिसर्स आणि विद्यमान ऑफिसर्स यांच्याशी विचार विनिमय केला.

१–१–१९३१ ला भरलेल्या अल्प संख्यांक जमातींच्या सबकमिटीच्या तिसऱ्या बैठकीत बाबासाहेबांनी हा प्रश्न उपस्थित केला. अस्पृश्यांच्या लष्करी पेशावर सरकारने जी १८९२ सालापासून कुऱ्हाड उगारलेली आहे त्यामुळे अस्पृश्यांवर सरकारने फार मोठा अन्याय केलेला आहे, आणि हा अन्याय दूर करण्यात आला पाहिजे असा त्यांच्या भाषणाचा सारांश होता.

('......Upto 1892 practically whole of the Madras Army and the whole of the Bombay Army consisted of members drawn from the Depressed Classes. All the great wars in the history of India has been fought with the help of sepoys drawn from the Depressed Classes, both in Bombay Presidency and in Madras. Yet in 1892, a rule or regulation was made which debarred the Depressed Classes from entry into the military service, and even to day, if you ask a question in the Legislative Council as to why this is done, the answer is that the bar of untouchability does create inseparable difficulties in the recruitment of these classes,........' Proceedings of Sub-Committees Vol. III (Minorities|2nd R. T. Conference page 76) Ambedkar's speech dated 1-1-1931.

बाबासाहेबांच्या या प्रयत्नातूनही कांहीच निष्पन्न झाले नाही. पेन्शनरांचेही प्रयत्न चालूच होते.

'महार सेवा संघ' मुंबई यांच्या विद्यमाने चिपळूण येथे पांचवे अधिवेशन १२–५–३४ ला भरले होते. अध्यक्ष सिनियर ऑफिसर, पेन्शनर, हिरू रामजी घुगे (देवकेकर) होते. आणि स्वागताध्यक्ष होते, पेन्शनर, सुभेदार रामोराम संजन घाटगे (घरेडकर), ऑनररी मॅजिस्ट्रेट हे होते. अस्पृश्यांची भरती लष्करात करावी हा एक ठराव सभेत मंजूर झाला व तो सरकारकडे पाठविला.

युद्धांचे ढग युरोपच्या आकाशांत जमा होऊ लागलेले १९३९ ला दिसू लागले. इंग्लंड व ब्रिटिश साम्राज्य यांना भाग घेणे भाग पडले. या युद्धांत जर ब्रिटिश साम्राज्यातील देशांनी, इंग्लंडला विनशर्त मदत केली नाही तर ब्रिटिश साम्राज्याची धडगत रहाणार नाही व त्याचबरोबर साम्राज्यातील देशांनाही वाईट दिवस येतील. तेव्हा भारतातील अस्पृश्यांनी सरकारशी अडवणुकीचे धोरण न ठेवता सैन्यात दाखल व्हावे व सरकारला सर्व बाजूंनी सहाय्य करावे असे पत्रक 'Depressed Classes and the War' या शीर्षकाखाली रा. ब. एन्. सी. राजा, एम. एल. ए. प्रेसिडेंट, ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशन, यांनी जाहीर केले. (टाईम्स ५-९-३९, पा. १६) याला उद्देशून मी, (चरित्रकार श्री. चां. भ. खैरमोडे) 'The coming War and the Harijans' हा लेख बाँबे क्रॉनिकल मध्ये Young Harijan या टोपण नावाने लिहिला. अस्पृश्यांना मदतीची जरुरी पडेल तेव्हा त्यांना जवळ करावयाचे व आपले काम फत्ते झाले की त्यांना दूर लोटायचे हे सरकारचे धोरण अस्पृश्यांच्या लष्करी पेशासंबंधी १८९२ ते १९२२ च्या काळात होते हे लक्षात घेऊन अस्पृश्यांनी रा. ब. राजाच्या पत्रकाचा विचार करावा; आणि हे युद्ध संपल्यानंतर अस्पृश्यांच्या लष्करी पेशाबद्दल हमखास व कायमची तजवीज करण्यात येईल असे सरकारने आश्वासन दिले तरच आम्ही सैन्यात दाखल होऊ, असे जाहीर करावे, असा माझ्या या लेखाचा मतितार्थ होता.

**श्री. शिवराम जानबा कांबळे** यांनी १-८-१९८९ ला चेअरमन, आर्मी इंडियनायझेशन, डिफेन्स डिपार्टमेंट, सिमला, यांना एक अर्ज पाठविला. या अर्जाला १८-९-३९ ला उत्तर आले की हिंदूतील प्रमुख जातींची अस्पृश्यता, प्रमुख जातीचे लोक, लष्करातही मानतात (पाळतात); व त्याच भावना लष्करी अधिकारी लक्षात घेतात. म्हणून सरकार लष्करात अस्पृश्यांना घेत नाही. ज्या पलटणीतील अधिकारी (स्पृश्य हिंदू अस्पृश्यांच्या भरतीला विरोध करीत नाहीत, त्या पलटणीच्या अधिकाऱ्याच्या मर्जीवर अस्पृश्यांची लष्कर अवलंबून आहे, असे सरकारी धोरण असल्यामुळे अस्पृश्यांच्या लष्कर भरतीबाबत खास सोयी करणे शक्य नाही. ते मूळ उत्तर असे :—

'No. B|56113|A. G. 2.
Army Head Quarters, India,
Adjutant General Branch,
Simla, the 19th August 1939.

From : The Adjutant General India,
To
Mr. Shivram J. Kamble,
1373, Kamathipura, 6th Lane,
Camp Poona.

MEMORANDUM.

With reference to his letter, dated the 1st August 1939, addressed to the Chairman, Indianization Committee, Mr. Shivram J. Kamble is informed that Mahars are eligible for recruitment in the Indian Army as a sub-class of Hindus. Although there is now no separate unit for Mahars, any unit authorised to recruit Hindus without restriction as to sub-class may take Mahars if it wishes to do so.

2. The general recruiting policy of Army Head-quarters is, however, to prescribe the main classes to be recruited and to leave the selection of sub-classes to the discretion of officers commanding units. Moreover, owing to the limited size of the Indian Army, extended recruitment of Mahars can be arranged only at the expense of some other deserving class now serving.

In these circumstances, it is regretted that Army Head-quarters cannot take any action to extend special facilities to Mahars in the matter of recruitment of the Indian Army.

Sd/-

For Adjutant General in India'.

३ सप्टेंबर १९३९ ला इंग्लंडने जर्मनी व इटली यांच्या विरुद्ध युद्ध पुकारले तेव्हां लगेच हिंदुस्थानच्या व्हाईसरॉयने पत्रक प्रसिद्ध केले की, हिंदी लोकांनी हे युद्ध जिंकण्यासाठी इंग्लंडला सर्व तऱ्हेने मदत करावी. व्हाईसरॉयच्या या घोषणेचे स्वतंत्र मजूर पक्षा (Independent Labour Party) तर्फे स्वागत करणारे, पत्रक बाबासाहेबांनी काढले. आपल्याला जरूर पडेल तेव्हांच हिंदी लोकांना लष्करी शिक्षण देण्यास व त्यांच्या लष्करी पेशाचा उपयोग करण्यास सरकार तयार होते; एरव्ही सरकार हिंदी लोकांच्या लष्करी पेशाबद्दल बेफिकीर रहाते; एवढेच नव्हे तर कांही जातींनाच उत्तेजन देते व इतर जातींना जवळही करीत नाही, सरकारचे हे स्वार्थी व धरसोडीचे वर्तन निंद्य होय. सरकारने हे निंद्य धोरण टाकावे हिंदी लोकांना लष्करी शिक्षण द्यावे, त्यांत स्पृश्य–अस्पृश्य असा भेद करू नये, आणि युद्ध समाप्तीनंतर या सर्व लष्करी शिक्षण घेतलेल्या लोकांना लष्करात कायमचे ठेवण्याची हमी द्यावी. शिवाय सरकारने हेही जरूर जाहीर करावे की युद्ध समाप्तीनंतर हिंदुस्थानला जो राजकीय दर्जा ब्रिटिश सरकार देईल तो वसाहतीचे स्वराज्य ( डोमिनियन स्टेटस ) हा होय. मग हिंदी लोक युद्धाला हातभार लावतील. शेवटी बाबासाहेबांनी असेही या पत्रकांत म्हटले होते की स्वतंत्र मजूर पक्ष युद्धास सर्वतोपरी साहाय्य करण्यास तयार आहे, कारण या बाबतीत

सरकारला अडविण्याची ही वेळ नव्हे.' हे पत्रक ता. १४-९-३९ (शुक्रवारच्या टाईम्समध्ये प्रसिद्ध झाले होते) ते असे :—

## INDIA MUST SUPPORT BRITAIN
## DR. AMBEDKAR ON MUTUAL DUTIES

The views that India should support Great Britain in the War is expressed by Dr. B. R. Ambedkar, President of the Independent Labour Party, outlining the parties attitude, in a statement to the press.

Tracing the events that led upto the war and attitude of Germany towards other nations. Dr. Ambedkar states that, having regard to the aspirations and ambitions of the Indian people, and having regard to the fundamental conflict between them and German ideal, India cannot avoid taking up the challenge of Germany and showing her readiness to vindicate her right to reach her destiny The Independent Labour Party therefore has no hesitation in saying that this is a war which the Indian people, in their own interests should support and held Great Britain to prosecute.

### IN THE COMMONWEALTH

Referring to the attitude of certain other parties towards the war, Dr. Ambedkar observes that so far as no one can visualise the near future, the best thing for India as to remain within the British Commonwealth of nations and strive to achieve the status of equal partnership therein, good long part of the road to that status has already been covered and the part that remains is also within reach. There is no knowing what India's fate would be under a new master.

At the same time Dr. Ambedkar emphasises that the British have certain duties towards India, and the first and foremost of them is to prepare Indians to defend their country, and to introduce compulsory military training for all persons within certain age.

It is astonishing, Dr. Ambedkar adds, that Government should call Indians to become combatants only when the war is on, and allow them to lapse into unserviceable non-

combatants as soon as the war is over. There is feeling that the reason why the British do not wish to introduce compulsory military training in India, is that they cannot trust Indians. Steps must be taken to remove such a suspicion. Recruitment to the Standing Army must be open to all communities.

## STATUS OF DOMINION

The second duty of the British towards India is to reassure her of the status she is to occupy in the British Empire. The reluctance of the British Parliament to embody in the preamble to the Government of India Act, the statement that India is ultimately to occupy the status of a Dominion has caused much heart-burning. The British must see that the doubts of India on this point are removed as early as possible.

The Independent Labour Party supports the appeal made by His Excellency the Viceroy to India to help Britain in the War. It agrees that this is no time for making conditions." — (The Times of India, 14-9-1939).

व्हॉईसरॉय साहेबांच्या घोषणेला उद्देशून श्री. भास्करराव जाधव यांनी टाईम्सला एक पत्र त्यांच्या वैयक्तिक जबाबदारीवर (मराठ्यांचा प्रतिनिधी अगर पुढारी म्हणून नव्हे) लिहिले होते. व्हॉईसरॉय साहेबांच्या घोषणेने कोणत्याही राजकीय पक्षाला उत्साह आला नाही. सदर घोषणेत व्यवस्थितपणे राजकीय हेतुबद्दल खुलासा केला असता तर राजकीय पक्षांना त्या घोषणेचा अन्वयार्थ लावता आला असता, असा श्री. जाधवांच्या म्हणण्याचा इत्यर्थ होता. मनुष्यबळ व युद्धसाहित्याला उपयुक्त अशा जिनसांचा पुरवठा करणे, या दोन्ही गोष्टी हिंदुस्थानातून करता येतील. मनुष्यबळ पुरविण्याच्या बाबतीत मराठा समाज आपल्या पूर्व परंपरेला जागेल. श्री. जाधवांचे हे पत्र २६-१०-३९ च्या टाईम्समध्ये प्रसिद्ध झाले होते ते असे :-

## 'MARATHAS AND WAR'

Sir, — His Excellency the Viceroy has made his declaration, but he has not succeeded in enthusing any party. The Congress Working Committee has condemned it. The liberals are also not satisfied with it. Mr Jinnah is sitting on the fence and his party may take office, at last in certain provinces, if and when the Congress Ministers resign.

I do not expect Congress will carry on propaganda hostile to British Government in order to create disturbances leading to breaches of peace. India can help Great Britain in two main directions providing recruits and supplying war materials; War materials can be purchased in any quantity and there is no dearth of any quantity and there is no dearth of merchants who will be ready to supply the demand when there is a prospect of profit. Indian merchants and bankers will subscribe liberally to future loans. As for recruiting, Sir Sikandar Hayat Khan has given an assurance that the Punjab, the Sword-arm of India will keep its reputation and provide a million fighters.

Although I am not authorised to speak on behalf of the Marathas, from my knowledge of my people I can confidently say that the Marathas who have for two thousand years maintained their reputation as though fighters, will not lag behind when a call is made and recruiting propaganda is vigorously carried on. His Highness the Maharaja of Kolhapur and other Maratha Princes have clearly given a lead in this matter and the Maratha people, who form the sward-arm of Bombay province, will not fail to respond.

In the last World-War, His late Highness Shahu Chhatrapati asked the Marathas to partake freely of horse-flesh in order to prolong the defence of Kut and the Maratha soldiers obeyed him. The House of the Great Shivaji is held in high veneration and the example so nobly set by His Highness Rajaram Chhatrapati Maharaj Saheb of Kolhapur will certainly be followed by the Marathas and thousands and lakhs of Marathas will join the army.

Bombay B. V. Jadhav.'

(The Times of India, 26-10-1939).

महाडचे श्री. एस. बी सावंत यांनी श्री. भास्करराव जाधव यांच्या पत्राला उद्देशून टाईम्सला पत्र पाठविले. त्यांत त्यांनी असे विचार प्रदर्शित केले की मराठा समाज आपापसातील फुटीमुळे आणि योग्य पुढाऱ्यांच्या अभावामुळे, राजकीय दृष्ट्या नगण्य झालेला आहे, आणि श्री. जाधव यांनाही सदर समाजाला एकत्र करणे

अशक्य झाल्यामुळे हा समाज इतर राजकीय पक्षांचे भक्ष्य बनला आहे. मराठा संस्थानिकांचे पुढारीपण, मराठा समाज आतां मान्य करणे अशक्य आहे. तेव्हां मराठा समाजाची दुही नष्ट करावी मग युद्धोपयोगी चळवळ हाती घ्यावी, वगैरे मुद्दे श्री. सावंत यांनी उपस्थित केले. ते पत्र ३-११-३९ च्या टाईम्समध्ये प्रसिद्ध झाले होते. ते असे :—

## MARATHAS AND WAR

Sir, — Mr. Jadhav's letter of immence topical importance for the side lights it throws upon the organisation of the Marathas as a political party. We witness today the disconcerting spectacle of a powerful community like that of the Marathas, with age-long traditions sinking into oblivion, thanks mainly to the proverbial disunity and want of leadership "If the 'sword-arm' of the province" is asked to subscribe its quota of man-power without our leaders being able to take counsel together and consolidate our position as much on the political as on the fighting front, our leader call for the recruitment would degenerate into an unrigorous call to serve as common-folder. But unfortunately so selplessly disunited is our community that even Mr. Jadhav who has represented it not only in the provincial and Central Legislatures but also at the Round Table Conference hesitates to speak on its behalf. The old leaders have either deserted us or else disowned by us. We are fast being absorbed by existing political parties with the result that we have a foot in every camp but have no camp of ours. We are owned by every political organisation but are trusted by none.

A suggestion is put that the Princes should take up the leadership. But this is calling old tunes which are out of date in the progressive world of today. The natural leadership of Princes has long ago disappeared. It is for the people themselves to organise and to frame their policy. If we now fail to awake and arise we will forever be fallen. Can we not rise to the occasion? Can we not even forget our differences and put up a united front? Is there no silver lining to the dark cloud of melancholy that over-

hangs our political existence together? I refuse to answer in the negative.

Mahad, October 26, S. B. Sawant.
(The Times of India, 3-11-1939).

मराठे तरुण लष्करात जातील, पण ते पद्धतशीर रीतीने आणि मराठ्यांच्या ऐक्याच्या जोरावर जातील तर मराठा समाजाला युद्धानंतर इंग्रज सरकारशी राजकीय हक्क मागण्यास भरपूर वाव (क्षेत्र) मिळेल, असा श्री. सावंत यांच्या पत्राचा ध्वनी होता. अस्पृश्यांना लष्करांत प्रवेश मिळत नसल्यामुळे तो सरकारने द्यावा ही अस्पृश्यांची मुख्य मागणी होती. त्या मागणीतच भावी काळात राजकीय हक्क मागण्यासाठी आवश्यक क्षेत्र तयार होत होते, हा त्याचा गर्भीत अर्थ होता. परंतु त्यावेळी त्याकडे कोणाचे लक्ष नव्हते. **ही दृष्टी बाबासाहेबांकडे होती**; यांत तीळमात्र संदेह नाही. अस्पृश्य तरुणांनी मिळेल त्या लष्करी खात्यात आपला शिरकाव करून घ्यावा, आणि सरकारने अस्पृश्यांना लढावू सैनिक म्हणून स्वीकारावे आणि त्यांच्या स्वतंत्र पलटणी उभारण्यात या दोन मुद्यावर बाबासाहेब, सभेतून व खाजगी भेटीतून प्रचार करीत होते. ते २८ जानेवारी १९४० ला रत्नागिरीला आले असतांना त्यांचे दर्शन घेण्यास हजारो लोक आले. त्यांत सैन्यांत भरती होण्यास तयार झालेले कुणबी व महार जातीचे तरुण होते. या तरुणांना त्यांनी उपदेश केला की तुमच्या बापजाद्यांनी इंग्रज लोकांना पूर्वी फार मोठ्या प्रमाणांत लष्करी सहाय्य केले होते व सरकारनेही त्यांची खूब रास्ती होती. लष्करी पेशातील महारांचा दर्जाही उंचावला होता. १८९२ ला महारांना, लष्कर प्रवेशावर बंदी घातल्यामुळे त्यांची आर्थिक व सामाजिक परिस्थिती एकदम खालावली, आतां लष्करात पराक्रम करून तुम्ही सरकारला लष्करी प्रवेश बंदी उठवावयास भाग पाडा आणि आपल्या महार समाजाच्या दर्जा (उंचवावा) असा बाबासाहेबांनी त्यांना उपदेश केला. याबद्दलचा वृत्तांत ३१-१-४० च्या टाईम्समध्ये (पा. ११) प्रसिद्ध झालेला होता तो असा :-

'MAHARAS URGED TO JOIN ARMY

DR. AMBEDKAR'S APPEAL

Ratnagiri, January 29.

An appeal to Kunbis and Mahars to come forward and join the Army was made by Dr. Ambedkar, when a number of Mahars recently enrolled as recruits came in a body last evening to pay their respect to him as their leader.

Dr. Ambedkar expressed appreciation of their decision to enroll. Military occupation, he said, was closed to them

on account of caste prejudices, although they had rendered good service in the past. At one time practically ¾ of the Bombay army was drawn from the Mahars and they had fought a great many battles on the side of the British, including the famous battle of Koregaon, when the Peshwa was defeated and the British established their supremacy.

After the mutiny of 1857, he went on, other classes joined the Army. Their prejudices had to be respected and the recruitment of Mahars was therefore stopped. The new recruits had this the responsibility to regain their past position in the army'. (The Times of India, 31-1-1940).

१९४० च्या पूर्वार्धात बाबासाहेबांनी महारांना लष्करात प्रवेश मिळावा व त्यांच्या पलटणी तयार कराव्यात, याबद्दल चळवळ व पत्रव्यवहार केला. मुंबईचे गव्हर्नर यांनी बाबासाहेबांच्या चळवळीकडे सहानुभूतीने पाहून, हिंदुस्थान सरकारला, महारांना लष्करात प्रवेश देण्यास भाग पाडले. या बाबतीत १९४१ च्या जूनमध्ये सरकारी हुकूम निघाला. तेव्हां बाबासाहेबांनी टाईम्सला एक पत्र पत्र पाठविले व त्यात इंग्रज सरकारच्या दुष्ट धोरणाचा इतिहास देऊन त्याबद्दल कडक शब्दात आपला निषेध व्यक्त केला. महारांची लष्करात भरती करण्यांचा हुकूम मुंबईच्या गव्हर्नराच्या मध्यस्तीने निघाला व आपल्या फार दिवसांच्या प्रयत्नांना यश आले. महार तरुणांनी, लष्करांत नोकरी करण्याची ही जी संधी आलेली आहे, तिचा स्वतःच्या व समाजाच्या हितासाठी उपयोग करावा, आणि ब्रिटिश सरकारने युद्ध-समाप्तीनंतर महारांना लष्करी पेशात कायमचे राहू द्यावे, अशी विनंतीही त्या पत्राने, बाबासाहेबांनी केलेली होती. ते पत्र १८-६-४१ च्या टाईम्समध्ये प्रसिद्ध झाले होते ते असे :-

Readers Views; Recruitment of Mahars Sir :— The Mahars have been a martial people. The army of the East India Company which successfully fought against the army of the Peshwa was recruited from the Mahars. The last battle between the Peshwa and the British was fought at Koregaon in the Poona District. There is a column at Koregaon raised by the British to commemmorate the battle. On the column are inscribed the names of the soldiers who fell in the battle on the side of the British. Nine out of ten names are of Mahars. The recruitment of Mahars continued upto 1892 and in all the wars, the Mahars have proved their martial qualities. All of a sudden the recruitment of Mahars was stopped in 1892. Ever since the Mahars have nursed a

grievance against the British Government for what they regarded as very ungrateful conduct. There is much injustification for this grievances, for there can be no doubt that without the help of the untouchables the British would never have been able to conquer India.

The Mahars carried on a great agitation against their banishment from the army. But it bore no fruit. It was during the war of 1914 that the British Government under necessity lifted the ban and raised the Mahar Battalion. It was raised at the fog end of the war and the battalion had no opportunity to go on was service and show its mettle. It was posted in Waziristan in the North-West Frontier Province, and it is on record while almost every battalion stationed in the N.W.F. lost some rifles and ammunation to the Pathans, who are in the habit of raiding ammunition and rifle depots to arm themselves, the Pathans did not succeed in stealing a single rifle or a single cartridge from the Mahar battalion. It was expected that the British Government, having re-enfranchised the Mahars for military purposes, would continue the Mahar Battalion and add to it more Mahar Battalions. But instead the British Government on the excuse of economy, disbanded the Mahar Battalion. This caused great bitterness in the minds of Mahars. When the present was came, the Mahars hoped that their turn would come. But the steps taken by the British Government in the early stage of the war only added insult to injury. The Mahars were only wanted for labour corps and not for the combatant ranks. The labour corps is safer than the combatant ranks, but the Mahars wanted to join the combatant ranks. One of the banalities of the British Government in India is there distinction between martial and non-martial classes. Nothing has been more disastrous. It is a pity that so great a catastrophe as the war was necessary to enforce the British Government to give up this senseless distinction. It is stated that Government have directed to raise a Mahar battalion. The credit

must go to H.E. The Governor of Bombay. On my making it a grievance, he took up the matter with the Central Government and brought it to a successful issue. I appeal to the Mahars to take advantage of this opportunity both for appeal to the British Government to keep faith with the Mahars and not to disband them from the army after the war is over.

Bombay (Dr.) B. R. Ambedkar

(The Times of India, 18-6-1941)

जपानने, १९४१ साली फेब्रुवारीत, जर्मन व इटलीच्या बाजूने दुसऱ्या महायुद्धात प्रवेश केला. त्या देशाने आपल्या लष्करी सामर्थ्यावर ब्रिटिश साम्राज्यातील आग्नेय आशियातील प्रदेश भराभर काबीज केले तेव्हां भारत, ब्रह्मदेश, सिलोन, सिंगापूर इत्यादी प्रमुख भागांच्या संरक्षणाची ब्रिटिश सरकारला भयंकर चिंता वाटू लागली. तेव्हां त्यांनी **प्रादेशिक सैन्य** भरतीचा जोर केला. साम्राज्यातील इतर देशांतून व भारतातून लाखो लोक लष्कर भरतीसाठी पुढे आले. त्यांना सर्व आघाड्यांवर पाठविण्यात आले. या लष्कर भरतीत अस्पृश्यांचा फारसा भरणा नव्हता; कारण स्पृश्य शिपाई अस्पृश्य शिपायांबरोबर काम करण्यास तयार नव्हते, त्यामुळे अधिकारी वर्ग अस्पृश्यांना आपल्या बटालियनमध्ये घेण्यास तयार नसत म्हणून सरकार त्यांना भरती करून घेत नव्हते. या सरकारी अन्यायाविरुद्ध महार सैनिक व अधिकारी यांनी जाहीर सभांतून खूप हाकाटी केली; पण तिचा काही उपयोग झाला नाही. दुसऱ्या महायुद्धात जपानने उडी घेतल्यानंतर सरकारने महारांची पलटण उभारण्याचे जाहीर केले. तेव्हा जनता पत्राच्या २१-६-१९४१ च्या अंकात 'महारांची नवी पलटण, शिवाबर घेतले म्हणजेच आमची आठवण होते' या मथळ्याखाली अग्रलेख लिहून, संपादकाने सरकारच्या गेल्या ५० वर्षांतील स्वार्थी व कृतघ्न कृत्याबद्दल खरपूस समाचार घेतला. अस्पृश्यांनी या संधीचा भरपूर उपयोग करून, लष्करी पेशात नाव काढावे असाही सल्ला, सदर अग्रलेखात दिला होता.

दुसरे महायुद्ध सुरू झाले, तेव्हा हजारो महार तरुणांनी आम्हाला लष्करात घ्या, अशा अर्थाचे अर्ज सरकारकडे पाठविले. या विनंतीला सदर्न एरिया रिक्रूटिंग स्टाफ व त्यांचे प्रमुख कर्नल **के. ई. फ्रँक्स**, डी. एस. ओ. आणि असिस्टंट डायरेक्टर ऑफ रिक्रूटिंग साउथ, यांनी ताबडतोब पाठिंबा दिला. त्यांनी पलटणीतील बीन लढाऊ सेवक म्हणून त्या महार तरुणांना निरनिराळ्या पलटणीत व पथकांत नोकरीवर ठेवले. १९४० मध्ये महार तरुणांच्या ॲम्बुलन्स रक्षक म्हणून दोन पलटणी उभारण्यात

आल्या. महार रेजिमेंट तयार करावी, असा हुकूम मिलिटरी खात्याने १९४१ च्या सप्टेंबरमध्ये काढला, तेव्हा फर्स्ट महार बटालियन बेळगाव येथे १ ऑक्टोबर १९४१ ला उभारण्यात आली. ही बटालियन बेळगावहून कामटी ( नागपूर ) येथे नेण्यात आली. सेकंड महार बटालियन, कामटी येथे १ जून १९४२ ला उभारण्यात आली. तिसरी महार बटालियन, १ नोव्हेंबर १९४३ रोजी नौशेरा (वायव्य सरहद्द प्रांत) येथे उभारण्यात आली. याप्रमाणे महारांच्या तीन बटालियन्स अस्तित्वात आल्या. त्यांचे रेजिमेंटल सेंटर, सागर ( मध्य प्रदेश ) येथे ठेवण्यात आले. येथे बटालियन्सच्या नव्या शिपायांना सर्व प्रकारचे शिक्षण देऊन तयार करण्यात येत असे. या तिन्ही बटालियन्सना दुसऱ्या महायुद्धात समरांगणावर जाण्याचा प्रसंग आला नाही. त्या अंतर्गत शांतता राखीत होत्या. परंतु दुसऱ्या महायुद्धानंतर **त्यांनी काश्मिरच्या समरांगणात एवढी मर्दुमकी गाजवली की, लष्करी अधिकाऱ्यांनी व खुद्द सरसेनापतींनी महार सैनिक, हिंदी सेनेतील उत्कृष्ट लढवय्ये आहेत असे जाहीरपणे गुणगौरवपर उद्गार अनेक वेळा काढले.**

26. At the out break of this (World-War II) war, the MAHARS immediately started petitioning for a MAHAR unit to be raised. This petition was backed by SOUTHERN AREA RECRUITING STAFF, specially by colonel K. E. FRANKS, DSO, Assistant Director, of Recruiting South several thousands of MAHARS had again by now disappeared in labour and other units.

27. In 1940 an opportunity was given to them as special troops to ambulance units. Two troops were thus raised and were a great success.

28. In Sept. 41 sanction was received to start the MAHAR REGIMENT. The 1st Battalion of MAHAR REGIMENT was thus raised on 1st Oct. 41 at BELGAUM. This Bn later moved from BELGAUM to KAMPTEE for various reasons. There are now three Bns with a Regimental centre. The 2nd Bn was raised on 1st June 42 at KAMPTEE and the 3rd Bn was raised at NOWSHERA in the N. W. Frontier Province on 1st Nov. 43. The training company which formed the nucleus of the present Regimental centre was raised on 1st Oct. 1942.

29. All these Bns were war raised and as such they did not get the chance to go to the fighting areas. Although

their fighting qualities could not be tried in the World War II, the latest events show that the MAHARS are one of the finest soldiers in the Indian Army' (The MAHAR MG Regiment, Page 11).

दुसरे महायुद्ध संपल्यावर हिंदी लष्कराची पुनर्रचना कमांडर-इन चीफ, फिल्ड मार्शल **सर क्लॉड अचिनलेक** यांनी केली. तेव्हा सर्व हिंदी लष्करातून दोन रेजि-मेंटसना मिडियम मशिनगन रेजिमेंटस् म्हणून ठेवण्याचे ठरविले. त्यांत एक रेजिमेंट महारांची होती. या दोन्ही रेजिमेंटस्चे नामांतर इन्फंट्री बटालियन्समधून मशिनगन बटालियन्समध्ये १ ऑक्टोबर १९४६ ला करण्यात आले. (किस्सा, पान. ११)

पहिली व दुसरी महार बटालियन यांच्यात जे नवे महार तरुण भरती होतील त्यांना लष्करी शिक्षण देण्यासाठी कामठी येथे १ ऑक्टोबर १९४२ ला जे केंद्र सुरु करण्यात आले त्याचे नेतृत्व कॅप्टन **एफ. डी. मार्शल**, यांच्याकडे होते. या केंद्रातील शिक्षण दोन्ही महार बटालियन्स आणि फिफ्थ मराठा लाईट इन्फंट्री रेजिमेंटल सेंटर यांतून घेतलेले होते. या शिक्षक कंपनीचे रुपांतर १ जून १९४३ रोजी महार ट्रेनिंग बटालियनमध्ये करण्यात आले. या शिक्षण केंद्रात पहिले शिक्षक म्हणून सुभेदार मेजर **दत्तू यादव** हे फिफ्थ मराठा लाईट इन्फंट्रीमधून घेण्यात आले. मेजर **मार्शल** यांना लेफ्टनंट कर्नल म्हणून बढती मिळाली व त्यांच्या जागी लेफ्टनंट कर्नल **जी. ए. क्रॉफर्ड** हे फिफ्थ मराठा लाईट इन्फंट्रीमधून १ फेब्रुवारी १९४४ ला आले. १९४६ मार्चमध्ये फिल्ड मार्शल सर **क्लॉड ऑचिनलेक** यांनी फर्स्ट महार बटालियन गरडाई, वझिरीस्तान येथे सांगितले की ही बटालियन मशिनगन रेजिमेंट म्हणून निवडण्याचे ठरलेले आहे. १ ऑक्टोबर १९४६ ला कामटीच्या शिक्षण केंद्राचे **'महार मशिनगन रेजिमेंट सेंटर'** असे पुनश्च नामांतर करण्यात आले. लेफ्टनंट कर्नल **आर. एच. लो** यांनी त्याचे नेतृत्व स्वीकारले. महार बटालियनमध्ये महाराष्ट्रातील महार तरुणांची भरती होत होती. त्या भरतीला उत्तेजन यावे म्हणून हे रेजिमेंटल सेंटर १५ ऑक्टोबर १९४६ ला कामटीहून नगर जिल्ह्यातील आरणगाव येथे नेण्यात आले. (किस्सा, पा. १३)

पहिली बटालियनला मे १९४२ मध्ये पहिले जबाबदारीचे काम मिळाले, ते रांचीहून बंगलोरला इटालियन कैद्यांना आगगाडीने नेण्याचे ते काम सदर बटालियनने इतके चोख बजावले की तिचे सर्व अधिकारी खूष झाले. ऑगस्ट १९४२ मध्ये नागपूर प्रांतात सविनय कायदेभंगाची चळवळ जोरात चालू होती. ती नुसत्या पोलिसांकडून आटोक्यात आणणे अशक्य झाले तेव्हा सरकारला लष्करी सहाय्य घेणे भाग पडले. सीताबर्डीच्या पंचक्रोशीत शांतता प्रस्थापित करण्याचे कार्य पहिल्या बटालियनने केले. (किस्सा पा. २८) बटालियन मधील एक कंपनीला, कॅप्टन **जी. के. करंदीकर** (नंतर ले. कर्नल) यांच्या नेतृत्वाखाली डिसेंबर १९४२ मध्ये उत्तर सीमेवर

जावे लागले. तेथे सहा महिने शिक्षकाचे काम उत्तम प्रकारे केल्याचे अभिप्राय अधिकाऱ्यांकडून मिळवून कंपनी परत कामटीला १९४३ च्या मध्यंतरात परतली. त्यानंतर वजिरीस्तानच्या गरजाई केंद्रात नऊ महिने बटालियनला राहावे लागले. तेथे तेव्हा थंडीचे दिवस असल्यामुळे बर्फ एकसारखे पडत होते आणि या जवानांना तर बर्फाचा सराव नव्हता, त्यामुळे त्यांना या वस्तीत खूप कष्ट पडले; तरीही तेथील वजिरी टोळ्यांच्या माऱ्यांमुळे त्या जवानांनी आपली हिम्मत खचू दिली नाही. **नं. १२१९, शिपाई, मलुप्पा वाघमारे** आणि **नं. ४४० शिपाई बळवंत मोरे** यांनी खूप पराक्रम करून वजिरी टोळ्यांना परतविले आणि हे करीत असता समरांगणात स्वतःचे बलीदान केले. (किता, पा. २९–३०) नोव्हेंबर १९४२ मध्ये बिहारच्या भागलपूर जिल्ह्यात कायदा व शांतता प्रस्थापित करण्यासाठी पहिल्या बटालियनला कार्य करावे लागले. (कि. ५१). सहरसा, पूर्णिया व भागलपूर जिल्ह्यांतून बटालियनने १८० मैलांचा लांब रूटमार्च केले. बटालियन दररोज २०–२५ मैल चालून जात असे. लष्कराचे हे अस्तित्व पाहून लोक शांत झाले. यानंतर बटालियनला ऑगस्ट १९४७ मध्ये दिल्लीला नेण्यात आले. दिल्लीतील जी मुसलमान कुटुंबे पाकिस्तानात जाणार होती; त्यांना आगगाड्यातून सिमेवर सुरक्षितपणे पोहोचविण्याचे काम बटालियनला करावे लागले. २२ आगगाड्यातून २५–३० हजार मुसलमानांना सुरक्षितपणे नेण्याचे अवघड कार्य या जवानांनी केले. या बाबतीत यांना प्राण धोक्यात घालून मुसलमान निर्वासितांचे रक्षण करावे लागले. याबद्दलची दोन उदाहरणे उल्लेखनीय आहेत. ११ सप्टेंबर १९४७ ला दिल्लीहून अत्तारीला, आगगाडी मुसलमान निर्वासीतांना घेऊन चालली होती. महार मिडियमगनची एक तुकडी सुभेदार के. गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली, आगगाडीचे रक्षक म्हणून आगगाडीतील निरनिराळ्या डब्यात बसली होती. रेल्वे लाईनवर कोणीतरी अपघाताने कारस्थान अगोदर केल्यामुळे जलंदर शहराच्या नंतर गाडी रुळावरून घसरली तेव्हा आसपासच्या भागातून शेकडो हिंदू व शीख लोक हातांत काठ्या, तलवारी व भाले घेऊन मुसलमान प्रवाशांना मारण्यासाठी धावून आले. **सुभेदार गायकवाड** यांनी आपल्या सैनिकांना या हल्लेखोरांवर गोळ्या झाडण्याचा हुकूम दिला. सर्व डब्यांतून दोन्ही बाजूनी गोळ्यांचा वर्षाव होत असलेला पाहून हल्लेखोर पळून गेले व दूर उभे राहिले. हे हल्लेखोर परत गाडीवर चाल करतील हे ओळखून सुभेदाराने गार्डाला आगगाडी परत जालंदर शहराला नेण्यास हुकूम दिला. जालंदरच्या स्टेशनावर पुनः दुसऱ्या थव्याने आगगाडीवर हल्ला केला. तेव्हांही सुभेदाराने सैनिकांना गोळीबाराचा आदेश दिला, तेव्हा हल्लेखोरांचा जमाव दूर पळाला व तेथे उभे राहून "आम्ही मुसलमानांना कापणार" अशा घोषणा देऊ लागला. असा हा प्रकार तीन दिवस चालू होता. मुसलमान प्रवासी आगगाडीच्या डब्यात जीव मुठीत घेऊन तीन दिवस अन्न–पाणी व झोप यांच्याशिवाय गप्प बसून राहिले होते. मुले, भूक व तहान यांनी व्याकूळ होऊन रडत होती. सुभेदाराने, स्टेशनपासून दूरच्या

ठिकाणी पाणी आणण्यासाठी सैनिकांच्या दोन तुकड्या पाठविल्या. त्यांनी जेव्हा पाणी आणले तेव्हां ते सर्व प्रवाशांना पिण्यास दिले. **सुभेदार गायकवाड** यांनी प्रसंगावधान व धैर्य दाखवून निर्वासित प्रवासी मुसलमानांचे प्राण वाचविले. चौथ्या दिवशी आगगाडी, रेल्वेलाईन दुरुस्त झाल्यावर जालंदरच्या पुढे निघून इष्ट स्थळी मुसलमान प्रवाशांना पोहचविले. दुसरी गाडी मुसलमान प्रवाशांना घेऊन त्याच मार्गाने चालली होती, त्यावेळी जोराचा मुसळधार पाऊस आला. पावसामुळे जालंदरजवळची रेल्वे लाईन उध्वस्त झाली. **सुभेदार के. मोरे** यांच्या नेतृत्वाखाली या गाडीचे रक्षण करणेचे काम होते. **सुभेदार के. मोरेही** गाडीत होतेच. जालंदरला गाडी उभी असलेली पाहून शेकडो हिंदू व शीख हल्ला करण्यास धाऊन आले आणि सांगू लागले "तुम्ही तुमचे सैनिक बाजूला घ्या आम्ही सर्व मुसलमानांची कत्तल करतो." **सुभेदार मोरे** उत्तरले की तुम्ही हल्ला केला तर मी माझ्या सैनिकांना तुमच्यावर गोळ्या झाडण्याचा हुकूम देईन व तुम्हां सर्वांना भुईसपाट करीन, **सुभेदार मोरे** हल्लेखोरांचे व यांचे कडाक्याचे बोलणे १२–२० मिनिटे चालले. हल्लेखोर ऐकत नाहीत असे पाहून **मोरे** यांनी सैनिकांना फायरींगसाठी तयार व्हा असा जोरात ओरडून हुकूम दिला; तेव्हा हल्लेखोर पळून गेले. रेल्वेलाईन दुरुस्त झाल्यानंतर गाडी, ५ दिवसांनी इष्ट स्थळी पोहोचली. या दोन महार लष्करी पथकांच्या नायकांनी आपल्या कर्तव्यावर नितांत निष्ठा ठेऊन हजारो–लाखो मुसलमानांना पाकिस्तानच्या हद्दीवर नेऊन सोडले. ( किस्सा पा. ३३–३४ )

ता. २७ ऑक्टोबर १९४७ ला पहिल्या बटालियनला हुकूम मिळाला की त्यांनी काश्मिर–जम्मू येथे जावे. बटालियनची एक तुकडी काश्मिर व दुसरी जम्मू येथे विमानाने गेली. जम्मूहून ती कंपनी तीन दिवसांनी नौशेरला (वायव्य सरहद्दप्रांत) पाठविण्यात आली. तिसरी कंपनी ४ डिसेंबरला जम्मूला पोहोचली. या बटालियन्स काश्मिर व जम्मू आघाडीवरच्या रणांगणात १८ महिने लढत होत्या. ( किस्सा पान. ३४ )

पूंच, कोटली, झांगर आणि नौशेरा येथील रणक्षेत्र बर्फाच्छदित उंच हिमालय पर्वतावर होते. या क्षेत्रात महार सैनिकांनी, रात्रंदिवस शत्रूला १८ महिने तोंड देऊन विजयावर विजय मिळविले; आणि काश्मिरच्या रणभूमीवर अभूतपूर्व विक्रम केला की त्याचा नामोल्लेख भारतीय इतिहासात मोठ्या अभिमानाने करावा लागेल.

(35. The part played by the Bn during its 18 months stay in Jammu and Kashmir will go down in the History of KASHMIR operations in general and the Regiment particular. Each coy surpasses the other in the glorious work performed in its respective theatre of operations. More than any body else the Infantry Bn to which the sections and platoons were attacked remember with affection and gratitude the work MAHARS had done along with them.' — The Mahar MG Regiment, page 34).

हवालदार **रावू कांबळे** आणि **नाईक बारक्या कांबळे** हे आपली तुकडी घेऊन झांगर या रणक्षेत्रावर ६००० शत्रू सैन्याला सामोरे गेले. त्या ६००० शत्रू सैनिकांना आपल्या तुकडीतील ५० सैनिकांनिशी तोंड देत राहिले व त्यांचे इतर सहकारी शत्रूच्या तावडीत सापडू नयेत म्हणून शत्रूवर गोळ्यांचा वर्षाव करीत राहिले. या **कांबळे** द्वयांनी शत्रूला जागचे जागी थोपवून धरले आणि आपल्या सहकारी तुकड्यांना शत्रूच्या कब-ज्यातून बाहेर पडण्यास भरपूर वाव दिला, त्यावेळी तुकडीतील सर्व सैनिक कामास आलेले होते. आता या दोघा वीरांवर शत्रूने हल्ला चढविला व ते दोघे ज्या इमारतीच्या आश्रयाने गोळ्यांचा वर्षाव करीत होते त्या इमारतीलाच आग लावून दिली. आणि त्या दोघांना पकडून त्यांचा शिरच्छेद केला; अशाही स्थितीत त्या दोघांच्या हातातील मशिनगन्स आपले काम चार–पांच सेकंद करीतच राहिल्या. या दोन वीरांची नांवे बटालियनच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहीली गेली. डिसेंबर १९४७ च्या काळात कंपनीने जो रणसंग्राम काश्मिरच्या रणभूमीवर केला त्यांत १० सैनिक कामास आले, ६ जखमी झाले आणि १ बेपत्ता झाला.

झांगर येथील संग्रामात जे महार बटालियनचे थोडे बहुत नुकसान झाले होते त्याचा वचपा दुसऱ्या कंपनीने नौशेरच्या ६ फेब्रुवारी १९४८ ला झालेल्या रणसंग्रमात काढला. या लढाईतील तुकडीचे नेतृत्व **नाईक कृष्णा सोनवणे** आणि **पुंडलिक महार** यांचे होते. या दोघानी शौर्याची कमाल केली. त्या दोघांनी सुमारे १००० शत्रूंना एका दमात गारद केले. जम्मू व काश्मिर यांच्या रणक्षेत्रात जेवढी शत्रूंची संख्या मृत म्हणून गणली गेली; त्यात नौशेरच्या रणक्षेत्रातील हा एक हजार शत्रूंना ठार केल्याचा आकडा सर्वांत मोठा होय.

जम्मू आणि काश्मिर येथील समरांगणात पहिल्या महार बटालियन मधील ज्या महार तरुणांनी आपले देह धारतीर्थी ठेवले त्यांच्याबद्दल अनेक जणांनी प्रशंसोद्गार काढलेले आहेत.

('54. The following are the circumstances under which the gallant MAHARS laid down their extreme devotion to duty.

Short history of some other ranks, who lost their lives in J and K operations.

(a) On 24th Dec. 47 No. 4 Platoon, Y cop was occupying the defensive positions in JHANGAR. At about 06.00 hrs. enemy about 200 strong launched an attack on JHANGAR. One MMG subsection commanded by Naik BARKYA KAMBLE was in position inside a building. As the enemy was strong in number and fire power, the infantry on our side started losing ground and were pressed

back. But Naik BARKYA KAMBLE with his men stuck to their gun positions undaunted and kept on firing their gun. The enemy had come too close and in the absence of any opposition surrounded the house and set it on fire. The whole subsection lost their lives but refused to surrender. The following were in the brave team:—

1) NK. BARKYA KAMBLE, 2) Sep. YESHWANT KAMBLE, 3) MARUTI SARJE, 4) GURBAL SABLE, 5) TUKARAM KAMBLE, 6) SONYA POWAR, 7) MARUTI TAMBE.

(b) In this very operation Hav. RAAOO KAMBLE, who was commanding another sub-station also lost his life. He had taken the place of No. 1, stuck to his position and kept on firing his gun till his head was chopped off by the enemy.

(c) The following persons who were in the Platoon HQ. also lost their lives in this operation. 1) Sep. SURYAJI HATE, 2) JANU TAMBE, 3) GANGARAM MOHITE, 4) KONDIBA AKHALE and 5) SWBR BAPU LACHMAN.

55. During Dec. 47, 165 Inf. Bde advanced on CHIKOTHI and HAV. SEWAK JADHAV with his section was detailed from the coy, to support 7th Bn. The SIKH Regiment. After capture of CHIKOTHI, he dug a trench and took up the position. The enemy started shelling. The position with his heavy guns and unluckily he was flatly wounded and died.' (The Mahar MG Regiment, page 40-41).

पहिल्या महार बटालियनला जम्मू व काश्मिर भागातून हिंदूस्थानात नेण्याचे मुक्रर करण्यात आले ही बटालियन जम्मू–काश्मिरमधून प्रयाण करण्याचे आदल्या दिवशी मेजर जनरल **के. एस. थिमय्या** यांनी बटालियनला समारंभपूर्वक निरोप दिला. जम्मू व काश्मिरची रणभूमी अशी पहाडी आहे की तेथे मशिनगन हातात धरणाऱ्या जवानांचीच अत्यंत जरुरी होती. **पहिल्या महार बटालियनने** हे कार्य चोख केले आणि ते करताना मोठी मर्दुमकी गाजविली आणि महार बटालियनचे नाव अजरामर केले. १७ महिने सतत लढून तुम्ही यश मिळविले. आता तुम्ही भारतात जाऊन विश्रांती घ्या. तुमचे शुभ इच्छितो आणि परमेश्वर तुमचा पाठीराखा होवो एवढीच इच्छा व्यक्त करतो. जय हिंद! अशा अर्थाचे **मेजर जनरल थिमय्याचे** भाषण महार बटालियनपुढे झाले ते असे–

'Officers and men of I MAHAR MG Bn. you are assembled here today on the eve of your departure for India. You arrived in the JAMMU area at the end of Oct. 1947 and operated throughout JAMMU and KASHMIR on various roles in support of the Infantry. Due to the nature of the country when Machine Guns are found to be of great use. There was a great demand on you by all the Infantry Commands with the result that you have been split up into coys. platoons and even gun-teams throughout this wide area.

You have been taken prominent part in all the battles that have been fought in JAMMU and KASHMIR state and the name of your Bn will resound through the hills and valleys for a long time to come. Whereas all other units have been relieved some time or other in forward area during the course of the whole of these operations, your detachments have had to stay put wherever they were in action without relief and it speaks very high for your reputation as a fighting unit. Your men have stood the test of war and on all occasions behaved with the highest sense of gallantry, courage and endurance.

Among you exploits special attaintion must be made of your outstanding action in JHANGAR on 24 Dec. 47 when one of your platoons stuck to their post to the last round and the last man, inspite of the withdrawal of this troops whom you were supporting and this platoon continued fighting to the end. Two of the gun-teams died and the other two only withdraw when their amunation was expended. The action will go down in the history of your Regiment and that of the Indian army as one of the finest deeds of gallantry which have been performed in this theatre. On the 6 Feb. 1948 you distinguished — yourself in defending NAUSHERA against overwhelming and fanatical attacks by the enemy. You literally slaughtered the attackers and the numbers killed by your machine guns ran into thousands.

It was the end of April that your Bn less two coys formed part of this division and you took a prominent part

in all its actions. You supported the advance in May along the URI-CHAKOTHI road and capture of TITHWAL and finally the capture of DRAS and KARGIL. In all these operations you established a very high reputation courage and gallantry and you showed great endurance in the carriage and operations of your guns and equipments up and down the colossal heights in which these operations were carried out. I have been very proud to have you under my command and I am very sorry that you are leaving me now, but at the same time I am happy that after 17 months continuous fighting you are now going to have a well earned rest and hope that every one of you would be able to get to your homes and visit your families. I shall have the honour of commanding you again:

I wish you all the best of luck and God — speed.

"JAI HIND"

(The farewell message of Major General K. S. Thimayya DSO on the eve of the departure of the 1st Bn the MAHAR Medium Gun Regiment from JAMMU and KASHMIR to India in May 1948 The MAHAR MG Regiment, pages 37-39, by Colonel — Major General SPP Thorat DSO 1954, The Army Press, Dehradun).

पहिल्या बटालियनमधील वीरांनी जम्मू व काश्मिर येथील समरांगणावर जो नेत्रदीपक पराक्रम गाजविला, त्याबद्दल मेजर जनरल थिमय्या यांनी त्यांची तोंड भरून स्तुती केली. त्या वीरांपैकी सहा जणांनी लष्करी किताब मिळविले, एकाने 'महावीर चक्र' आणि पांच जणांनी वीर चक्र असे किताब मिळविले त्याबद्दलची हकिकत मी खाली देत आहे.

On 6 Feb. 1948 the enemy launched simultaneous attack on all NAUSHERA Piquets. The MMG post on No. 7 picquet was subjected to heavy small arms fire and heavily attacked by about twelve hundred of the enemy. The raiders advanced in mass formation from all directions. No. 718 Naik KRISHNA SONAWANE was in command of this post and opened up with his gun at point blank range. The raiders advanced in several waves and made series of



(1) No. 718 NAIK KRISHNA SONAWANE
1ST BN THE MAHAR MG REGT

attempts to assault this position. Naik KRISHNA SONAWANE maintained perfect coolness amongst his gun team and continued to inflict heavy casualties. During this engagement, the No. 1 of the gun who was operating it got wounded in the neck. Naik KRISHNA SONAWANE took over the gun himself and continued to operate it with all the skill. When so doing, his right hand was perforated by a full LMG burst fired at him by the enemy from a close range. This NCO though seriously wounded and regardless of the danger to his life continued to fire the gun with his left hand only, thus maintaining the momentum of fire at a very critical moment when the fate of the post was in balance. The gun was later damaged beyond repair, but this NCO kept on engaging the enemy by throwing hand granades with his left hand and also directed his gun team to do the same. The attack was beaten off with heavy losses to the enemy.

This NCO displayed personal courage, determination, coolness and devotion to duty and gave out standing lead to

his men for a very strained and trying period of two hours. His conduct was responsible for inflicting well over "SEVEN HUNDRED" casualties on the enemy and that of saving a very vital position.



VIR CHAKRA



(2) No. 62 HAVILDAR AMRUT GAMBRE
1ST BN THE MAHAR MG REGT

On 2 Nov. 48 at ZOJILA PASS, JAMMU and KASHMIR State, during the attack on MACHHOI, he was in command of a Machine Gun Section in support of the attacking Coy. His task was to silence enemy automatics in the hutted area, which was the chief obstacle in front of the coy. He so efficiently engaged the enemy position. At this stage his machine guns came under particularly heavy fire from a hidden enemy browning gun and also temporarily stopping the advance. Although under very heavy fire, he quickly switched on to the new target, thus enabling the coy to resume its advance.

On night 14/15 Nov. 48 at PUNIRAS during the attack BROWN HILL map ref 6958 when the attacking coy was held up by heavy enemy automatic fire, he engaged the enemy guns effectively releasing a good deal of pressure on the Coy. His own gun positions became a particular target of enemy mortars and browning guns, badly hitting the whole area. And there being no alternative position near by, he kept on firing his guns quite unmindful of the grave personal danger and thus helping to keep the enemy head down.

On both these occasions this NCO displayed outstanding courage, tenacity and dauntless spirit. By his brave performance he has earned the respect of all ranks of his Bn for his machine gun support. We shall all remember his stout hearted association for a long time.

---

## VIR CHAKRA



(3) No. 687 DHONDU JADHAV
1ST BN THE MAHAR MG REGT

On the 14 Apr. 48 during the Battle of RAJOURI, he was number 2 of an MMG attached to the Kumaon Rifles. Advancing towards Pt. 3178 (SQ 4229) the forward Coy came under heavy automatic fire from a dominating ridge beyond. When it was decided to send the MMG to the top of the hill, the MMG number No. 1 very cleverly built cover for the gun on the top of the hill. Sep. DHONDU JADHAV also followed his leader and even when very heavy fire was directed against them he never wavered.

The next morning the enemy swept the hill with fire prior to forming up for an assault. As a result NAIK BALIRAM SALVI the MMG No. 1 was wounded in the head. Consequently, the MMG No. 1 stopped firing momentarily. Realising the very vital role the MMG was playing in this battle, Sep. DHONDU JADHAV gallantly lifted his leader aside and continued firing. At one time it appeared as if his gun post might be over-run by the enemy, but with remarkable tenacity this sepoy denied the enemy respite. His firing was so accurate and effective that the enemy, eventually, gave it up as a bad job. The enemy was pounced upon by the forward Coy and the objective captured.

This sepoy displayed the highest devotion to duty and it was a direct result of his tenacity, courage and determination that the enemy position was captured.

——o——

VIR CHAKRA



(4) No. 7194 UP/L/NAIK ABA KIRATKUDE
1ST BN THE MAHAR MG REGT

On 23 June at MACHOI MR NN 5645 (JAMMU and KASHMIR), he was MMG No. 1 on picquet MG NN 5948 Enemy put in an attack on this picquet under support two brownings and two 3 inch mortars and reached some 600 yds of the picquet position. He was responsible for effectively breaking up the enemy attack and causing him at least 11 casualties. Although the enemy mortars and brownings were chifly directed against him, but he stubbornly continued firing most effectively throughout the day and did not allow the enemy to recover his casualties.

On 29 June 48 at about 06-00 hrs. enemy 150 strong attacked a subsidiary section picquet MR NN 5649 under support two 3 inch mortars of the picquet position and there was a grave danger of the picquet being over-run. His effective enfilade fire on the attacking enemy was to a great measure responsible for the holding out of this small

garrison against very heavy odds. The enemy now concentrated his MMGs Mortars fire to knock out this MMG to enable him to advance further. Large number of bullets struck his bunkar and hit his barrel casing, but this tenacious NCO kept on engaging the enemy most effectively at a grave personal risk and fired no less than 3750 rds.

At 0915 hrs. his MMG had a stoppage, necessitating the change of a lock, which involved his moving out to another bunkar in full view of the enemy and while so doing he was hit by an MMG burst in the left fore arm, causing heavy bleeding. He did not allow his serious injury to interfere with his job and got his weapon firing again quickly. The Coy Comdr told this NCO to get back to a safer place for medical attention, but he volunteered to be allowed to carry on saying that he had got the target well registered and could do more useful work.

Throughout two day's tough engagements, this NCO displayed high skill at his weapon, continuous courage, dogged determination and high sense of devotion to duty. He has earned a great respect from this unit for Machine gunners.

——o——



(5) No. 666 NAIK BALIRAM SALVI
1ST BN THE MAHAR MG SEGT.

On 14 Apr. 48 during the battle of RAJOURI, he was incharge of a machine gun attached to Kumaon Rifles. Advancing towards Pt 3178 SQ 4229 the forward coy came under heavy automatic fire from a ridge beyond, and was pinned down. It was decided to send Naik BALIRAM SALVI'S gun to the top of the hill, since there was only one likely point where the machine gun could be positioned, the approach was under constant automatic fire. This NCO very cleverly collected boulders and throwing them up advanced behind them. By the time he had reached the top, he had collected sufficient number of boulders to make cover for his machine gun. This done, he positioned his gun behind the cover and literally gave the enemy hell until they withdrew. He showed remarkable coolness, courage and determination.

The next morning on 15 Apr, the enemy tried to form up to rush the post. Naik SALVI came under heavy automatic and mortar fire. He fired back undaunted untill

wounded himself, in the head. Completely disregarding his own safety he kept on firing until relieved by his number two. In fact, even after he was relieved he kept shouting instructions to his number two until he had to be evacuated, still in his senses through sheer force of will.

This NCO shcwed remarkable determination and initiative. He completely disregarded his personal safety. His act of utter selflessness and conspicuous gallantry saved the lives of many of his comrades. His was an act of extreme cold courage.



## VIR CHAKRA



(6) No. 5428664 SEP PUNDALIK MAHAR
1ST BN THE MAHAR MG SEGT.

During attack on NAUSHERA on 6 Feb. 48, the MMG Post on picquet No. 7, commanded by No. 718 Nk KRISHNA SONAWANE was heavily attacked by overwhelming and superior numbers of the enemy. No. 4528664 Sep. PUNDLIK MAHAR was No. 1 of the gun. The enemy advanced in mass formation from all directions and reached at a close range to this post. No. 4528664 Sep. PUNDLIK MAHAR opened up with his gun at point blank range and continued firing for about one and a half hour until he was wounded in the neck. The sustained and determined effort made by this sepoy in engaging the series of enemy waves at extremely and alarmingly close range to the post saved this vital position from falling into the hands of the raiders.

The skill, courage, coolness of mind, determination and devotion to duty displayed by this sepoy was of high order and was responsible for inflicting at least "FIVE HUNDRED" casualties on the enemy and saving the vital position.

पहिल्या बटालियनचे अधिकारी येणेप्रमाणे होते :–

**कमांडिंग ऑफिसर्स** :—

१) लेफ्टनंट कर्नल **एच. जे. आर. जॅक्सन**
१ ऑक्टोबर १९४१ ते १३ ऑक्टोबर १९४४

२) ले. क. **जी एच. युस्टेज**,
१४ ऑक्टोबर १९४४ ते २४ जुलै १९४५

३) ले. क. **ई. जॉन्सन**,
२५ जुलै १९४५ ते १४ नोव्हेंबर १९४७

४) ले. क. **कर्तार सिंग**,
१५ नोव्हेंबर १९४७ ते २७ जानेवारी १९५१

५) ले. क. **के. एम्. शहाणे**
२८ जाने. १९५१ ते २१ ऑगस्ट १९५१

६) ले. क. **कपूर सिंग**,
२३ ऑगस्ट १९५१

**सुभेदार मेजर** :—

१) सु. मे. **इस्लुद्दिन** १ ऑक्टो. १९४१ ते ऑग. १९४९.

२) सु. मे. **सुकाम** दस्तगिरखान ऑ. १९४५ ते सप्टें १९५०
(ऑननरी लेफ्टनंट–मृत)

३) सु. मे. **बापूराव पोवार** – जाने. १९५१

(The MAHAR MG REGIMENT, page 26).

पहिल्या बटालियनची ६ ट्रेनिंग कंपनी १ जानेवारी **१९४२** ला उभारण्यात आली. तेव्हा सैनिकांची संख्या सुमारे ५०० होती. या कंपनीतून दुसरी बटालियन १ जून १९४२ ला निर्माण केली. या दोन्ही बटालियन्सचे जन्म दिवस निरनिराळे असले तरी सोईसाठी त्यांचा वाढदिवस दरवर्षी १ जानेवारीलाच करण्यात येत असे.

दुसऱ्या बटालियनमध्ये लेफ्टनंट **मॉर्टलमॅन्स** हा अधिकारी कलाकार होता. त्याने याच सुमारास महार बटालियनसाठी एक बॅज तयार केला त्या बॅजवर कोरेगांवचा विजयस्तंभ भरण्यात आला. (THE MAHAR MG REGIMENT, page 43)

जमशेदपूरचा लोखंडी कारखाना, चाकुलिया, चकरधरपूर, चोवका, खरगपूर, आणि कटक येथील विमानतळ यांचे संरक्षण करण्यासाठी दुसऱ्या बटालियनला कामटीहून १९ डिसेंबर १९४२ ला हलविण्यात आले. वेळ पडल्यास ब्रह्मदेशांत युद्ध आघाडीवर तिला पाठविण्याचे ठरले होते, आणि त्या हेतूने त्या बटालियनला शिक्षण दिलेले होते. त्याप्रमाणे या बटालियनच्या कांही तुकड्यांनी उकल, इंफाल व भीषमपूर

येथे व कांहींनी, अक्याब व ब्रह्मदेश मधील इतर भाग येथें लढाईंत भाग घेतला. (किस्ता पा. ४३–४५) या निरनिराळ्या लढायांत पराक्रम केलेल्या चार महार वीरांची नांवे जाहीर करण्यात आली :– १) १८६ **लगन सोनवणे** (जखमी) २) ६४४६ **शिपाई संपत भिसे** (गोळी लागून कामास आला) ३) **जमादार** (नंतर सुभेदार) **रघुनाथ मोरे** (जखमी) आणि ४) **नाईक सखाराम चौरे** (जखमी) एप्रिल १९४५ मध्ये बटालियन रांची येथे तळ देऊन राहिली, ते दुसरे महायुद्ध संपेपर्यंत. युद्धांत विजय मिळाला म्हणून विजय संचालनाचा कार्यक्रम हिंदुस्थानात करण्यात आला; तेव्हा या बटालियन्सच्या दोन कंपन्यांनी त्यात भाग घेतला होता. (किस्ता, पा. ४५).

इराकमध्ये बिघडलेल्या परिस्थितीला ताब्यात आणण्यासाठी आणि तेथील कायदा व शांतता राखण्यासाठी दुसऱ्या बटालियनला सप्टेंबर १९४५ मध्ये बसऱ्याला नेण्यात आले. तेथून बटालियनला कुरमशहर येथे तायग्रीस नदीवरून नेण्यात आले. बेस अमॅन डेपो, या कुरम शहरापासून १७ मैलावर असलेल्या, शाहिबा येथे होता. तेथील शस्त्रागारातून चोर, शस्त्रे व काडतुसे चोरून नेत. आणि शस्त्रास्त्रांनी भरून जात असलेले ट्रक्स, लुटीत असत. या चोरांना दहशत बसेल असे कार्य सुभेदार (नंतर सुभेदार मेजर) **बसवंत बंदसोडे** आणि त्यांचे दोन शिपाई या तिघांनी, शेकडो अशा तऱ्हेच्या चोरांच्या टोळ्या व त्यांचे हल्ले यांना जीव धोक्यात घालून खतम केले. याबद्दल या तिघांचे त्यांचे अधिकारी व सहकारी यांनी अभिनंदन केले (किस्ता. पा. ४६). फील्ड मार्शल **सर क्लॉड आचिनलेक** यांनी शाहिबाला भेट दिली व तेथे महार वीरांनी जे शौर्य गाजविले त्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले. या वीरांनी महार जातीचे नांव गाजविले, असे त्यांनी उद्गार काढले. महार बटालियनस हिंदी लष्कराचे प्रमुख घटक म्हणून राहतील, असेही ते म्हणाले, (किस्ता पान ४७).

दुसरी बटालियन ऑक्टोबर १९४६ मध्ये हिंदुस्थानात आली. तिचा तळ दौंड येथे ठेवण्यात आला. (किस्ता). या बटालियनला दौंडहून सांडेमन किल्ल्यावर एप्रिल १९४७ मध्ये नेण्यात आले. जूनमध्ये बटालियनने हॉकी चॅंपियनशिपची ढाल जिंकली. या किल्यात १५ ऑगस्टला जो (पहिला) स्वातंत्र-दिन साजरा करण्यात आला तेव्हा तेथील सेरिमोनियल परेडमध्ये बटालियनचे महार सैनिक परेडच्या आघाडीवर होते (किस्ता. पा. ४७). तद्देशीय मुसलमान आणि पठाण–रानटोळ्या यांनी क्वेटा भागांत मुसलमानेत्तरांना ठार करण्याची चळवळ सुरू करून धुमाकूळ माजविला. तेव्हा तेथील भागात शांतता व कायदा प्रस्थापित करण्यासाठी या बटालियनला तेथे पाठविण्यात आले. हे काम बटालियनने अल्पावधीत यशस्वी रीतीने पार पाडले. या अराजक परिस्थितीच्या वेळी अनेक हिंदु स्त्रियांना मुसलमानांनी पळवून नेले. तीन पठाण एका हिंदु तरुणीला बळजबरीने ओढून नेत असता ती तरुणी "मला वाचवा! मला वाचवा!" असा मोठ्यांदा आक्रोश करीत होती. तिची ती स्थिती पाहून बटालियन मधील, १२७५ **नाईक गोपाळ मोरे** याने त्या तीन पठाणांवर हल्ला करून त्या तरुणीला सोडविले.

पण त्या तीन पठाणांचे जातभाई धाऊन आले व **नाईक गोपाळ मोरे** याजवर हल्ला करून त्याला ठार केले. याबद्दल अशीही एक अफवा आहे की राष्ट्रीय स्वयंसेवक आणि पोलीस यांनीच **मोरेला** ठार केले. क्वेट्यांत शांतता प्रस्थापित झाल्यानंतर बटालियनला हिंदुस्थानांत पाठविण्यात आले. ज्या आगगाडीने बटालियन हिंदुस्थानात परत आली त्याच गाडीतून शेकडो हिंदू कुटुंबे, निर्वासित म्हणून बटालियनच्या संरक्षणाखाली दिल्लीला आणण्यात आली. ही गाडी ड्रायव्हर व गार्ड भलत्याच दिशेने नेत आहेत, हे लक्षात आल्यानंतर बटालियनच्या अधिकाऱ्यांनी त्यांना धमकी दिली की, असले चाळे तुम्ही केलेत तर तुम्हाला ठार करण्यांत येईल, आणि त्यांच्यावर तीन-चार सैनिकांचा पहारा बसवून आगगाडी दिल्लीला आणण्यात आली. ( किस्सा पा. ४८ ). बटालियन दिल्लीत आली. तेव्हा तिचा तळ लाल किल्ल्यात पडला. तेथून तिचे सैनिक दिल्लीतील पहाडगंज जुम्मामशीद आणि पुराणा किल्ला येथील भागात शांतता प्रस्थापित करण्यासाठी रात्रंदिवस काम करीत होते. हिस्सार जिल्ह्यात ( पंजाब ) हिंदु-मुसलमानांच्या दंगलीला उत आला तेव्हां बटालियनला शांतता प्रस्थापित करण्यासाठी तेथे पाठविण्यात आले. हे कार्य करीत असता, एका ट्रक मधून एक सैनिक तुकडी मशिनगनवर कपडा टाकून दुसऱ्या जागी जात असता मुसलमानांच्या एका जमावाने त्या ट्रकवर लाठ्या, तलवारी व भाले घेऊन हल्ला केला, तेव्हां धैर्य खचू न देता त्या सैनिक तुकडीचा मुख्य, **सुभेदार बनसोडे** याने त्या जमावाला दूर रहा म्हणून हुकूम दिला, पण तो हुकूम जमावाने न मानता ट्रकला गराडा घातला. लागलीच सुभेदार **बनसोडे** याने मशिनगनमधून गोळ्या झाडण्याचा आदेश दिला. गोळ्यांचा वर्षाव होताच मुसलमानांचा घोळका पळून गेला. कांही लोक गोळ्यांना बळी पडले. या प्रसंगावधानाच्या कार्याबद्दल **बनसोडे** याला लष्करी बहुमान-शिफारस पत्र-देण्यात आले. (किस्सा, पा.४९) हिसारमधील हिंदू व मुसलमान या एक लाख निर्वासितांना केंद्रावर नेण्याचे [illegible] कष्ट काम या बटालियाने बजावले. या वेळी बटालियनचे मुख्य जनरल महाराज **श्री. राजेंद्र सिंहजी** ( डी. एस. ओ. ) यांनी या कार्याची स्तुती केली ( किस्सा पान ४९. )

बटालियनच्या जवानांना विश्रांती मिळावी म्हणून बटालियनला दिल्लीस जानेवारी १९४८ मध्ये नेण्यात आले व तिचा तळ निकोल्सन बराकीत ठेवण्यांत आला. परंतु जवानांना विश्रांती मिळाली नाही. ३० जानेवारी १९४८ शुक्रवारला सायंकाळी **महात्मा गांधी** यांचा खून झाला; आणि लगेच बटालियनच्या जवानांना दिल्लीत, ठिकठिकाणी, कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी जावे लागले, खुद्द पंत प्रधान पं. जवाहरलाल नेहरु व इतर मंत्री यांच्या संरक्षणाची जबाबदारी या महार सैनिकांवर सोपविण्यांत आली. इंग्लंड, राष्ट्रकुलांतील देश आणि तुर्कस्तान यांचे जे राजनैतिक वकिल दिल्लीत होते त्यांचे संरक्षण करण्याचे काम याच जवानांवर सोपविण्यांत आले. आणि या जवानांनी ही सर्व कामे इतक्या उत्तम व यशस्वी रीतीने

पार पाडली की पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरु, त्यांची स्तुती खाजगी बैठकीतही करू लागले. ( कित्ता ).

पूर्व पंजाबच्या सीमेवर पाकिस्तानकडून जुलै १९४८ मध्ये अन्यान्य वेळा हल्ले करण्यात आले. तेव्हां या परिस्थितीला तोंड देण्यासाठी या बटालियनला जालंदरला नेण्यांत आले. या सीमाभागाचे संरक्षण डिसेंबर १९४८ पर्यंत केल्यानंतर बटालियनची जम्मू व काश्मिर भागात जरुरी भासू लागली, तेव्हां डिसेंबरचे काही दिवस बटालियनला होशियापूर येथे जम्मू व काश्मिरच्या रणक्षेत्राला उपयुक्त असे शिक्षण घ्यावे लागले व त्या नंतर तिला त्या रणक्षेत्राकडे फेब्रुवारी १९४९ मध्ये नेण्यात आले. बटालियनच्या तुकड्या दक्षिणेत सांब ते पुंच व उत्तरेस उरी, टिठवळ, गुरेझ आणि लेह या सीमाभागांत शत्रूंना तोंड देण्यासाठी विभागण्यांत आल्या. हे कार्य बटालियनने उत्तम रीतीने केले आणि पूर्वीप्रमाणेच नांवलौकिक कमाविला. बटालियनला जम्मू–काश्मिर येथून १ जानेवारी १९५१ ला भारतात नेण्यांत आले. तिचा तळ सिमल्यातील दागशाई या डोंगराळ प्रदेशांत पडला. तेथे लष्करी शिक्षण, कवायती आणि खेळ यामध्ये बटालियनने थोडा वेळ घालविला. पूर्व पंजाबच्या सीमेवर पाकिस्तानी आक्रमण वेळोवेळी होऊ लागल्यामुळे तिकडे सीमासंरक्षणासाठी बटालियनला जुलै १९५१ च्या दुसऱ्या आठवड्यांत नेण्यांत आले. अनेक अडचणींना आणि संकटांना तोंड देत व हालअपेष्टा सहन करीत बटालियनने सीमेवरील पाकिस्तानी हल्ले बंद पाडले. या लढाईनंतर बटालियनला मे १९५२ मध्ये अंबाला येथे नेण्यांत आले. या कंपनीचे सेनापती, लेफ्टनंट कर्नल **व्ही. बी. जाधव** हे ऑगस्ट १९४१ ते मे १९५२ पर्यंत होते. त्यानंतर अंबाला येथून त्यांची बदली आर्मी हेडक्वार्टला ( दिल्ली ) झाली. तेव्हां बटालियनचे सेनापतिपद लेफ्टनंट कर्नल **के. एम. शहाणे** यांना देण्यांत आले. ले. क. **व्ही. बी. जाधव** हे महार समाजाचे होते. ( कित्ता पा. ४९–५१ ).

दिवाळी कवायत व चंदीगड येथील फिल्म फायरींग यांत बटालियनने आपले नैपुण्य दाखविले ( ऑक्टोबर, नोव्हेंबर १९५२ ). डिसेंबर १९५२ मध्ये सरसेनापति जनरल **के. एम. करीअप्पा** ओ. बी. ई. हे सेवानिवृत्त झाले. तेव्हां त्यांच्या सन्मानार्थ जी परेड झाली तींत या बटालियनला घेतले गेले. त्या परेडमध्ये शिस्तबद्ध व आकर्षक पद्धतीने कवाईत करणारी ही बटालियन अग्रेसर ठरली. ज. करिअप्पांनी त्याच्याबद्दल गौरवोद्गार काढले, ते ह्या बटालियनच्या सेनापतीस कळविण्यांत आले. २६ जानेवारी १९५३ ला 'रिपब्लिक सेरेमोनिक' परेड दिल्लीत झाली, तेव्हां तिच बटालियनच्या एका कंपनीने भाग घेतला. त्या कंपनीने सर्व परेडमध्ये प्रथम क्रमांक मिळविला. या बटालियनचे आदर्श शिस्तबद्ध आयुष्य इतर बटालियनच्या अधिकारी लोकांना पहावयास मिळावे म्हणून ॲडमिनिस्ट्रेटर कमांडर, दिल्ली, यांनी त्या अधिकारी लोकांना बटालियनच्या छावणीत नेले. या सर्व लोकांनी बटालियन मधील महार जवानांच्या शिस्तबद्ध जीवनाबद्दल आणि लष्करी जीवनांतील चिवटपणाबद्दल खूप कौतुक केले.

('51. In Dec. 52, the Bn took part in a 4 Div. ceremonial parade to bid farewell to the outgoing C-in C. Gen. K. M. KARIAPPA, OBE. The Bn contingent was the best and the smartest in the March-past and C-M-C, while taking the salute, made, a remark to that effect, to the GOC 4 Div. The staff conveyed the appreciation and pleasure of GOC. On producing the smartest contingent on parade

52. In Jan. 53, Bn sent a Coy to take part in the Republic Day ceremonial parade at DELHI. During their stay in Delhi, the Coy excelled in line discipline. The Adm. Comdt DELHI was so pleased that he took the representatives of all other units to our unit lines to show them the model of the layout.

53. The Coys at this time were taking part in the Bde trg exercise and they acquainted themselves well in all exercises, All Commanders were full of praise for the way the men conducted themselves. One Bde comdr, who had the reputation of demanding the most exacting toughness from his troops, remarked in a conference that the MAHARS were the toughest troops under his command the training of last year had paid rich dividends. (The MAHAR MG REGIMENT, pages 52-53). ७ जुन १९४३ ला या बटालियनला दुसऱ्यांदा जम्मू व काश्मिर रणक्षेत्रात नेण्यांत आले (किला. पा. ५३)

दुसऱ्या बटालियनमधील अधिकारी खालील प्रमाणे होते.

### कमांडिंग ऑफिसर्स

१) लेफ्टनंट कर्नल जे. डब्ल्यू. के. किरवान
२ जाने. १९४२ ते ३ जाने. १९४७.

२) ले. क. जी. एच. नॅश, ओ. बी. ई.
४ जाने. १९४७ ते १३ एप्रिल १९४७.

३) ले. क. अजमीर सिंग, १४ एप्रिल १९४७ ते २७ जुलै १९४९

४) ले. क. व्ही. बी. जाधव, ३० जुलै १९४९ ते २० मे १९५२.

५) ले. क. के. एम. शहाणे, २१ मे १९५२.

### सुभेदार मेजर्स

१) सु. मे. भोलाजी रांजणे, १ जुन १९४२ ते ३१ ऑक्टो. १९४३.

२) सु. मे. **आप्पा लालखान** जाने. १९४४ ते जाने. १९४८.

३) सु. मे. (ऑनररी लेफ्टनंट) **श्रीमल विश्वासराव** एम्. सी. जाने. १९५१.

तिसरी बटालियन नौशेरा येथे १ नोव्हेंबर १९४३ ला उभारण्यात आली. तेथील सीमारक्षणांचे कार्य तिला देण्यांत आले. फेब्रुवारी १९४४ मध्ये बटालियनला नौशेर येथून रिसलपूर येथे नेण्यात आले. जूनमध्ये पुन: तिला नौशेरला नेण्यात आले. त्यानंतर कांही दिवसांनी तिला मालकेद येथे नेण्यात आले व परत नौशेरला तिला आणले. नंतर तीला सदैमान किल्ल्यावर नेऊन ठेवले. ही सर्व ठिकाणे बर्फमय प्रदेशात होती. तेथील शिस्तबद्ध रहाणी आणि कार्य यामुळे या बटालियनमधील जवानांची शरिरें पोलादी बनली. (किस्ता पा. ५५).

नोव्हेंबर १९४६ मध्ये बटालियनला पुण्यात नेण्यात आले. तेथे मशिनगनचे शिक्षण घेतल्यानंतर बटालियनचे लढण्याचे सामर्थ्य वाढले. मशिनगन चालविण्यांत ही बटालियन इतकी तरबेज झाली की, ती बटालियन फक्त चार वर्षांची असतांही तिला **दुगल डी बाय ड्ही– "फोर्थ इंडियन डी बाय ड्ही"** या विश्वविख्यात लष्करी पथकांत सन्मानाने घेण्यात आले. एवढ्या अल्पकालांत एवढा मोठा मान मिळविणारी ही बटालियन भारतात अद्वितीय होय ! (किस्ता. पान. ५६).

मे १९४७ मध्ये राजकीय पुढाऱ्यांना कल्पना आली की, भारतात हिन्दुमुसलमान दंगे उद्भवतील व त्यांचे जास्त प्रमाण पंजाब-दिल्ली कडील भागांत राहील, म्हणून त्या दंगलींना पायबंद घालू शकणारी लष्करी पलटण या भागांत ठेवणे जरूरीचे आहे. या कामासाठि तिसऱ्या बटालियनची निवड करण्यात आली, आणि पुण्याहून त्या बटालियनला जालंदरला नेण्यांत आले. दंगलीना कह्यात ठेवणे आणि भाक्रा नानगल धरणासाठी, कोट्यावधी रुपयांची मालमत्ता जी त्या धरणाच्या चोहोबाजूला ठेवण्यांत आली होती तिचे रक्षण करणे; ही कामे या बटालियनने उत्कृष्ट रीतीने पार पाडली. ऑगस्ट १९४७ मध्ये होशियारपूरच्या भागांत दंगलींना उत आला, या दंगलींना ठेचून काढणे व शांतता प्रस्थापित करणे हे अधिकाऱ्यांना अशक्य कोटीतील वाटू लागले. या कामासाठी या बटालियनची योजना करण्यात आली; तेव्हां तीन दिवस इतका पाऊस पडला की होशियारपूरची दळणवळणांची सर्व साधने विस्कळीत झाली. बटालियनच्या जवानांची खांद्यावर शस्त्रास्त्रे व दारूगोळा घेऊन खेड्यापाड्यातून पदयात्रा केली, व तेथील लोकांत लष्करी दहशत निर्माण केली. मुकेरियन, मुदया इलियाना, उना, नानगल, आनंदपूर, गडशंकर, महालपूर नारू नानगल, नंदाचौर, नंदा वगैरे ठिकाणी तुकड्यांचा तळ ठेऊन, जवानांनी दंगे आटोक्यात आणले आणि मुसलमान कुटुंबांना आणून निर्वासित केन्द्रे उभारली. या केन्द्रातील सुमारे तीन लाख मुसलमान (स्त्री, पुरुष, मुले) यांना बटालियनने प्रथम पाकिस्तानच्या

सीमेवर सुरक्षितपणे पोहोचविले. (कित्ता पा. ५६–५७) १६ ऑगस्ट ते १८ सप्टेंबर १९४७ च्या काळात हे कार्य बटालियनने केले. पण त्यानंतर दंगली सर्वच ठिकाणी उफाळल्या; आणि हे काम फारच अवघड व धोक्याचे होऊन बसले. अशा परिस्थितीत बटालियनला रात्रंदिवस प्रवास करून मुसलमान कुटुंबांना आपल्या संरक्षणाखाली घेणे, निर्वासित मुसलमानांच्या छावणीत नेऊन सोडणे व नंतर ज्यांना पाकिस्तानात जाण्याची इच्छा होती त्यांना सिमेवर नेऊन सोडणे, ही कामे बटालियनने १९ सप्टेंबर ते १८ ऑक्टोबर १९४७ च्या काळात केली. या काळात बटालियने पांच लाखापेक्षा जास्त मुसलमानांना पाकिस्तानकडे नेले. मुलतान मुझफरगड आणि डेरा गाझीखान या पंजाबमधील जिल्ह्यातून सुमारे तीन लाख **मुसलमानेतर** लोकांना जवानांनी सात आठवड्यांत मुसलमानांच्या तावडीतून सोडवून आणले. आणि निर्वासितांच्या दहा बारा केंद्रात नेऊन ठेवले. ही केंद्रे बटाल्लियनच्या संरक्षणाखाली चालू करण्यात आली. (कित्ता पा. ५६–६१).

तिसऱ्या बटालियनने हिंदु व मुसलमान कुटुंबांना सुरक्षितपणे निर्वासित केंद्रावर नेऊन पोहोचविले, आणि केंद्रांचे संरक्षण केले, याबद्दल जवानानी जे कष्ट घेतले व जी कर्तव्यनिष्ठा दाखविली, त्याबद्दल ब्रिगेडीयर **मोहमद मुनियार तिवाना** कमांडंड सोथ ब्रिगेड, मुलतान यांनी बटालियन प्रमुख ले. कर्नल **हरिसिंग** यांना पत्र पाठवून जवानांचा गौरव केला.

"TO............ "3rd Mahar Regiment was placed at the disposal of this H.Q to help in evacuation of non-Muslims from the civil districts Multan, Muzaffargarh end DERA GHAZI KHAN. They were unfortunate in arriving in this area at the time when the Muslim public as well as the civil authorities had a very little faith left in the troops from the dominion of India. The atmosphere then prevailing was full of mistrust and suspicion. 'However, Lt. Col. HARI SING, his officers and men set themselves to the task of restoring confidence among the Muslims which they soon achieved.

Inspie of continuous hard work without any break for weeks they kept smiling faces and carried out their duties extremely well. Except one or two very minor incidents they managed to avoid any friction or unpleasantness with Muslim public and they soon gained confidence of all those with whom they were brought in contact. Lt. Col. HARI SINGH and his men left no stone unturned in performing

their arduous and unpleasant duty as smoothly and quietly as it was possible for any troops to achieve. I very much appreciate their work and cooperation they extended to me, my staff and the civil authorities. This Bn is well commanded and should do well in whatever sphere they may be called upon to function." (The Mahar MG Regiment p. 62-63).

मेजर जनरल (नंतर ले. जनरल) **के. एस. थिमय्या** डी. एस. ओ, जी. ओ. सी., चौथी पायदळ डिव्हिजन, यांनी ले. कर्नल **हरिसिंग** यांना पत्र पाठवून तिसऱ्या बटालियनने हिंदु-मुसलमानांना जे संरक्षण दिले, त्याबद्दल जवानांचा गौरव केला.
("25....I have received a letter from the commandant ZHOB Bole, MULTAN, telling me how well you and your men have carried out their task in that area. You had very much difficult task working far away from your Base, underwent great strain and I congratulate you and your Bn on a hard job well done. Earlier your Bn did excellent work in HOSHIARPUR district of which I have personal knowledge. Will you please tell your officers and men how proud I am in having them under my command and I will take the first opportunity of thanking them personally." (Ibid, page 63).

तिसऱ्या बटालियनने डिसेंबर १९४७ च्या काळापर्यंत निर्वासितांना सुरक्षित ठिकाणी नेण्याचे कार्य यशस्वीपणे केले. त्यानंतर बटालियनला गुरुदासपूरला नेण्यात आले. पठाणकोट, डेराबाबा नानक आणि अमृतसर या सीमा भागातील खेड्यातील लोकांना संरक्षण देऊन त्यांच्यात विश्वास निर्माण करण्याचे कार्य बटालियनकडे देण्यात आले. या विस्तीर्ण क्षेत्रात, थोड्या जवानांनी पदयात्रा करून खेड्यातील लोकांना आपले जीवित व कोटकाफीला सुरक्षित राहील असे वातावरण निर्माण करून लोकांना दररोजचे उदरनिर्वाहाचे कार्यक्रम पार पाडण्यास उत्साह दिला. हे कार्य ही बटालियन आठ महिने करीत होती. नंतर १२ फेब्रुवारी १९४८ ला तिला बटाला (जि. गुरुदासपूर) येथे नेले, त्यानंतर कसौली (सिमला हिल्स) येथे नेले. या दोन्ही बटालियनने मशिनगनच्या फायरिंगची खूप मेहनत घेतली. १५ ऑगस्ट १९४८ ला स्वातंत्र्य दिन मोठ्या थाटाने सीमल्याला साजरा झाला. तेव्हां 'सेरेमोनियल परेड' साठी, कसौलीहून या बटालियनला सिमल्यास नेले. त्या परेडमध्ये जवानांनी आपल्या लष्करी वैशिष्ट्याचे जे मनोहरी प्रदर्शन केले ते पाहून सर्व लष्करी अधिकारी व प्रेक्षक आश्चर्याने थक्क झाले. पूर्व पंजाबचे राज्यपाल **श्री. चंदूलाल त्रिवेदी** यांनी जे भाषण केले त्यांत तिसऱ्या बटालियनच्या जवानांबद्दल अत्यंत गौरवपर उद्गार काढले, ते असे—

